पॉप्युलर प्रकाशन : १२

प्रकाशक :

गंगेश रामराव भटकळ
पॉप्युलर बुक डेपो
लॅमिंग्टन रोड, मुंबई ७

प्रथमावृत्ति
९ जानेवारी १९५५

पोलिस कमिशनरची परवानगी
नं. ५३७३ टी/१९५४

मुखपृष्ठ :
प्रभाकर गोरे

मुद्रक :
विष्णु पुरुषोत्तम भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबई ४

नाटकाची सर्व घटना नोव्हेंबर महिन्यांत शनिवार संध्याकाळपासून रविवार संध्याकाळपर्यंतच्या चोवीस तासांत घडली आहे.

०

स्थळ : पुणें शहर

अंक पहिला : नानांच्या बिऱ्हाडाची दर्शनी खोली

अंक दुसरा : अण्णासाहेबांच्या बंगल्याचा दिवाणखाना

अंक तिसरा : पहिल्या अंकाप्रमाणें

---

‘कक्षा’ नाटकाचा पहिला प्रयोग रविवार, ता. ९ जानेवारी १९५५ रोजीं संध्याकाळीं ६ वाजतां ‘कलाकार’ नाट्यसंस्थेनें मुंबई येथील जय हिंद कॉलेजच्या सभागृहांत करून दाखविला.

त्या प्रयोगांत खालील कलावंतांनीं भाग घेतला होता.

| | | |
|---|---|---|
| नाना | : | आत्माराम भेंडे |
| वसंत | : | शिवराम डोंगरे |
| अण्णासाहेब | : | अप्पा फडणीस |
| गोपाळराव | : | नाना भोर |
| सुनंदा | : | लिली केळकर |
| दिवाकर | : | सुधाकर करमरकर |
| ऊर्मिला | : | आशा भेंडे |

| | | |
|---|---|---|
| दिग्दर्शक | : | आत्माराम भेंडे |
| साहाय्यक | : | मुकुंद कोठारे |
| नेपथ्य | : | श्याम आडारकर |

बंदिवान् !

असाच तळमळत राहा.

लाटांवर अंग झोकून देण्याचें सामर्थ्य तुझ्यामध्यें नाहीं,

म्हणून किनाऱ्यावरच घुटमळत राहा.

कक्षेची मर्यादा तुला ओलांडतां येत नाहीं.

म्हणून आखीव रिंगणांतच गरगरत राहा.

तुझ्या पायांत तुझ्या व्रताची बेडी आहे.

तूं स्वतःचाच गुलाम झालेला आहेस.

सागराची विशालता,

अवकाशाची अथांगता,

तुला कधींहि उमगणार नाहीं.

अंधारांत घिसळून जाण्याचें धैर्य तुला नाहीं.

म्हणून तुला प्रकाशहि सांपडणार नाहीं.

दुबळ्या जीवा,

तुला संयत जीवनाचा शाप आहे !

# १

पुण्यामधल्या एका जुन्या वाड्याच्या दुसऱ्या मजल्यावरील बिऱ्हाडाची दर्शनी खोली. मागच्या बाजूला जिन्यावरून आंत येण्याचा दरवाजा आहे. प्रेक्षकांच्या उजव्या हाताला असलेला दरवाजा ऊर्मिलेच्या खोलीकडे जातो आणि डाव्या बाजूचा दरवाजा स्वयंपाकघराकडे जातो. दोन्ही भिंतींच्या मागच्या अंगाला उंच कोनाडेवजा खिडक्या आहेत.

मागच्या भिंतीला लागून असलेले तंबोऱ्याचे स्टँड्स, त्यांच्या खालच्या कप्प्यांत ठेवलेले तबले आणि डग्गे, जवळच हार्मोनियमच्या तीन-चार पेट्यांची रचलेली चवड, उजव्या हाताला अगदीं पुढें असलेला ऑर्गन आणि डाव्या हाताला दाराच्या पाठीमागें अंथरलेली पांढरी शुभ्र बैठक या सर्व गोष्टी हें एका गायनमास्तरांचें घर आहे असें स्पष्ट दर्शवितात.

दोन-तीन जुनाट खुर्च्यांनीं खोलींत उगीचच दाटी केलेली आहे. उजव्या हाताला दाराच्या पाठीमागें असलेलें छोटें गोल टेबल आणि त्यावरची फुलदाणी खोलीला आधुनिकता आणूं पाहतात. याशिवाय डोळ्यांत भरणारें सामान म्हणजे मागच्या भिंतीवर लटकणारे दोन फोटो—एक रामपंचायतनाचा आणि दुसरा मास्तरांच्या उस्तादांचा.

—नोव्हेंबर महिन्यांतला एक शनिवार. संध्याकाळचा साडेपांचचा सुमार; उजव्या बाजूच्या पश्चिमेच्या खिडकींतून तिरपीं झालेलीं उन्हें आंत येत आहेत. दोन्ही हातांची घडी घालून नाना त्या खिडकींतून दूर कुठेंतरी पाहात उभे आहेत.

जिन्यावर पावलांचा आवाज येतो. वसंत घाईघाईनें खोलींत शिरतो. आश्चर्यानें इकडे तिकडे पाहिल्यावर त्याचें लक्ष खिडकीजवळ उभ्या असलेल्या नानांकडे जातें. तो हलकेच त्यांच्या पाठीमागें जाऊन उभा राहतो.

वसंत : नाना—

नाना : (दचकून) अं? (वसंताला पाहून) आलास?

वसंत : मला वाटलं, मला बराच उशीर झाला. जोशी अन् सोमण आले नाहींत अजून?

नाना : इतक्यांत येऊन गेले ते दोघे—

वसंत : परत कां गेले?

नाना : (हंसून) तुला स्पेशल शिकवणी मिळावी अशी सोय केलीय् त्या दोघांनीं.

वसंत : म्हणजे? सकाळच्या क्लासला येणार आहेत ते?

नाना : अजिबात येणारच नाहींत.

वसंत : पण—पण असं मधेंच कां सोडलं त्यांनीं?

नाना : चालायचं—चालायचं! त्यांची परीक्षा आली जवळ, त्याला ते तरी काय करणार? झाला एवढा गाण्याचा नाद पुरा झाला असं वाटतंय त्यांना—(वसंत खालच्या मानेनें स्तब्ध राहतो, त्याच्याकडे थोडा वेळ पाहात) आणि तुझ्या वडिलांनीं मला पुरती विश्रांति मिळावी असं मनावर घेतलंय—

(वसंत नुसताच नानांकडे पाहतो.)

नाना : सकाळीं मंडईत गेलों होतों तेव्हां वाटेंत भेटले होते. विचारीत होते, चिरंजीवांची प्रगति कुठवर आलीय् म्हणून—

वसंत : मला उपदेश करायला सांगितलं असेल त्यांनीं!

नाना : (शुष्कपणें) त्यांचं म्हणणं तरी काय चुकीचं आहे? संगीत म्हणजे कानफाट्याचा धंदा. (हंसून) त्यांच्याच शब्दांत सांगायचं तर भिकेचं लक्षण. एवढं ढळढळीत माझं उदाहरण आहे ना डोळ्यापुढं?

वसंत : नाना—

नाना : त्यांची साहजिकच इच्छा आहे कीं, मुलानं आपल्या पाठीमागं वकिली चालवावी, आपल्यासारखं नांव कमवावं—

वसंत : पण मी तुम्हांला सगळ्यांना कितीदां सांगितलंय्, मला तें जमणार नाहीं. माझा जीव गुदमरतो त्या रुक्ष अभ्यासांत.

नाना : असं व्यवहारापासून अलिप्त राहून चालत नाहीं, वसंत.

वसंत : कां? लोकांत हसं होईल एवढंच ना? मला नाहीं त्याची पर्वा वाटत—

नाना : जोंवर पोटाची काळजी करणारं कोणीतरी असतं तोंवर असं बेधडक-पणानं बोलणं मोठं सुखाचं असतं, नाहीं रे?

वसंत : (दुखावलेल्या स्वरांत) नाना—

नाना : त्यांतून अगदीं अस्सल अर्स कांहीं जवळ असलं तर ठीक आहे. पण बहुतेकांच्या जवळ तें नसतं. सगळ्यांना फक्त वेडं होण्याचं वेड लागलेलं असतं. स्पष्टच बोलायचं तर—

वसंत : मला माहीत आहे तें. आजवर तुम्हीं आडून सांगितलंत. पण अण्णा नेहमींच तोंडावर सांगतात. मला माहीत आहे मी नालायक आहे तें—पण मला गाणं सोडायचं नाहीं. मला शिकायचं आहे तोंवर तुम्ही शिकवणार ना?

नाना : जोंपर्यंत तूं फी वेळच्या वेळीं आणून देत आहेस, तोपर्यंत शिकवणं भागच आहे मला. आणि तुझे वडील कितीहि रागावले तरी महिन्याच्या महिन्याला माझ्या तनख्याची तरतूद करतातच—

(थोडा वेळ स्तब्धता)

वसंत : (हलकेच) ऊर्मिला कुठं आहे?

नाना : (तुटकपणें) गेली असेल तुझ्या बहिणीबरोबर फिरायला—हं चल, घे तो तंबोरा.

(वसंत पेटी काढून बैठकीपुढें ठेवतो. तंबोऱ्याची गवसणी काढायला लागतो. इतक्यांत खालून 'मास्तर—अहो मास्तर, आहांत का घरीं?' अशी हाक ऐकूं येते. 'या—याहो—' असें म्हणतच नाना लगबगीनें खिडकीपाशीं जाऊन डोकावून पाहतात.)

नाना : (वसंताकडे वळून) तुझे वडील आले आहेत.

वसंत : (अस्वस्थ होऊन) अण्णा? अण्णा कसे आले बुवा?

नाना : (निरुत्साहानें) कांहीं कळत नाहीं.

**वसंत** : एकदां सोक्षमोक्ष करायचा ठरवलेला दिसतोय् त्यांनीं. (नानांच्या जवळ जाऊन विनवणीच्या स्वरांत) नाना—

**नाना** : (त्याच्या पाठीवर थोपटत) घाबरूं नकोस, वसंत. माझ्या हातांत आहे तेवढं करीन मी. त्यांतूनहि—

(तेवढ्या वेळांत वसंताचे वडील अण्णासाहेब आणि त्यांच्या मागोमाग दुसरे एक गृहस्थ जिना चढून येतात).

**अण्णासाहेब** : (आंत येतां येतांच) म्हटलं, मास्तर भेटतात कीं नाहीं. तुम्हांला कोण भेटायला आले आहेत पाहा तरी—

(ते गृहस्थ पुढें होतात. नाना आश्चर्यानें क्षणभर थांबतात. आणि मग आनंदाच्या भरांत त्यांच्याजवळ जातात.)

**नाना** : कोण गोपाळ ?

**गोपाळराव** : नाना !

(गोपाळराव नानांचे दोन्ही हात हातांत घेऊन हालवतात.)

**अण्णासाहेब** : (वसंताला उद्देशून) इथं आहांत वाटतं तुम्ही ! चुकला फकीर मशिदींत सांपडायचा. दुपारभर पत्ता कुठं होता तुमचा ? हातावर पाणी पडलं कीं गांव धुंडाळायला जायचं. घरीं कुणी आलंय्-गेलंय्—

(नाना पहिल्या आवेगानंतर भानावर येऊन त्या दोघांना बसायला खुर्च्या वगैरे देतात.)

**अण्णासाहेब** : (स्थानापन्न होतां होतां गोपाळरावांकडे वळून) हे आमचे चिरंजीव, वसंतराव, थर्ड क्लास इंटर झाले आहेत. (वसंताला उद्देशून) आणि ऐकलंत का ? हे गोपाळराव देशमुख. नागपूरचे प्रख्यात बॅरिस्टर आहेत बरं.

(वसंत कांहीं न बोलतां गोपाळरावांना नमस्कार करतो.)

**नाना** : (गोपाळरावांना) किती दिवसांनीं भेटतोंय् आपण !

**गोपाळराव** : दिवसांनीं का, वर्षांनीं म्हण, नाना.

**नाना** : (चाचरत) असे मधेंच कुठं आलांत इकडे ?

**गोपाळराव** : हा 'अहो जाहोचा' परकेपणा कशाला रे पाहिजे ! सरळ

'गोपाळ' म्हटलंस तर नाहीं का चालायचं !

अण्णासाहेब : (खुशामतीचें हंसूं आणून) हं–हं याला म्हणावं विनय ! केवढी विद्वत्ता, केवढी संपत्ति, केवढा अधिकार. पण माणूस पहावा तर किती साधा, किती सरळ, मनाचा किती मोठा ! (रागानं वसंताकडे पहात) हल्लीच्या पिढींत नाहीं बरं असले हिरे सांपडायचे.

गोपाळराव : मी आणि नाना अगदीं शाळेपासून तों थेट कॉलेजपर्यंत एका वर्गांत होतों, अण्णासाहेब.

अण्णासाहेब : वा तर ! अहो पण मी तरी तेंच म्हणतों. एकदा का माणूस उच्च पदावर गेला कीं त्यानं आपले लागेबांधे विसरून जायचे हा जगरहाटीचा नियम आहे, गोपाळराव. तर सांगायची गोष्ट काय, तुमच्यासारखं अगत्य दाखवणारा माणूस विरळा.

नाना : केव्हां आलास, गोपाळ ?

गोपाळराव : हा सकाळच्या एक्सप्रेसनं आलों.

नाना : माझ्याकडे कां नाहीं उतरलास ? अण्णासाहेबांसारखी बडदास्त मला ठेवतां आली नसती हें खरं आहे. पण—

अण्णासाहेब : (तावातावानें) म्हणजे वा मास्तर ! आतां हा—

गोपाळराव : (त्यांना मधेंच थांबवून) छे छे, तसं कांहीं नाहीं, नाना. मी आज दहा बारा वर्षांनीं पुण्याला आलों. तूं इथं आहेस कीं नाहींस याचासुद्धां मला पत्ता नव्हता. बरं, अगोदर कळवीन म्हटलं, तर पत्र टाकून उत्तर येईपर्यंत थांबायला सवड नव्हती.

नाना : तेंहि खरंच बाकी.

अण्णासाहेब : बरं का मास्तर, गेल्या मे महिन्यांत आम्ही आणि कुटुंब गेलों होतों ना पंचमढीला हवा बदलायला, तेव्हां गोपाळरावांची अगदीं अचानक गांठ पडली. बोलतां बोलतां दूरचं नातं पण निघालं. ते म्हणजे—बघा, आमच्या कुटुंबाच्या भावाच्या बायकोचे चुलतमामा लागतात. तर सांगायची गोष्ट काय, तेव्हांच आम्हीं त्यांना अगदीं बजावून सांगितलं होतं कीं, कधीं पुण्याला आलांत तर आमच्याकडेच उतरायचं. दुसरीकडे उतरलांत तर

आम्हांला अजिबात खपणार नाहीं. काय गोपाळराव ?

**गोपाळराव** : मुंबईला आलों होतों जरा कामाकरतां. इतका जवळ आलों, तेव्हां पुण्याला आल्याशिवाय राहवेना. इथं आल्यावर प्रथम तुझी चौकशी केली.

**नाना** : बरं, तें जाऊं दे. आतां आलाच आहेस तर निदान दोन तीन दिवस तरी रहा.

**गोपाळराव** : छे छे. उद्यां दुपारच्या गाडीनं निघायलाच पाहिजे मला. अगदीं म्हणजे नाइलाजच आहे, नाना.

**नाना** : मला आग्रह करायलासुद्धां वाव ठेवला नाहींस. बरं उद्यां दुपारीं जेवायला तरी येशील माझ्याकडे? इथूनच जा मग स्टेशनवर.

**गोपाळराव** : (घुटमळत) तें कसं काय जमणार, जरा शंकाच वाटते. ते डॉ. पेंडसे आहेत ना जिमखान्यावर—माझे दूरचे मेहुणे लागतात ते. त्यांना सहज कार्ड टाकलं होतं मी येणार म्हणून. आज दुपारींच येऊन उद्यांचं आमंत्रण देऊन गेले ते—

**नाना** : बरं मग आज रात्रींच ये. रात्रीं रहा इथं. बरं झालं, मनसोक्त गप्पा मारतां येतील—

**अण्णासाहेब** : छे छे छे छे मास्तर—अहो आज सकाळीं काय सगळं घाईघाईनं झालं. रात्रीं त्यांना मेजवानी दिल्याशिवाय आम्ही सोडणार आहोंत कीं काय! सगळया ऑर्डरीसुद्धां गेल्या आहेत. कसलं जेवण घेऊन बसलांत, मास्तर! आले, बसले, बोलले, झालं!

(जिन्यावर पावलांचा आवाज येतो.)

**नाना** : कोण आहे!

(अण्णासाहेबांची मुलगी सुनंदा आणि दिवाकर दोघें येतात.)

**अण्णासाहेब** : या या या ! काय योग आहे पहा गोपाळराव. तुम्ही पाहुणे आलांत आमच्याकडे, आणि आमच्या घरची सगळी मंडळी तुम्हांला भेटलीं इथं मास्तरांकडे. तुम्ही आलांत तेव्हां कॉलेजला गेलीं होतीं दोघं. ये नंदुताई—ही माझी मुलगी, सुनंदा. यंदा बी. ए.ला बसणार आहे. नमस्कार कर बाळ यांना. आणि हे आमचे भावी जामात दिवाकर.

(सुनंदा गोपाळरावांना वांकून नमस्कार करते. दिवाकरहि अर्धवट नमस्कार केल्यासारखं करून ऑर्गनजवळच्या खुर्चीवर जाऊन बसतो. अण्णासाहेब पाईप पेटवायला लागतात.)

**सुनंदा :** (दिवाकराजवळ येऊन हलक्या आवाजांत) झालं बाई! आतां थांबायला पाहिजे इथं थोडा वेळ आणि ऊर्मिलाहि दिसत नाहीं घरीं. आज कांहीं फिरायला जाण्याचा मुहूर्त लागेलसं दिसत नाहीं.

**दिवाकर :** तें आलंच होतं माझ्या लक्षांत. म्हणून मी आपला मुकाट्यानं खुर्ची घेऊन बसलों.

(सुनंदाहि जवळची एक खुर्ची ओढून घेऊन त्याच्याजवळ बसते. तिची त्याच्याजवळ एकसारखी खालच्या आवाजांत कुजबुज चाललेली असते. पण दिवाकराचें तिकडे फारसें लक्ष असल्यासारखें दिसत नाहीं. इतका वेळ एक मासिक चाळीत राहिलेला वसंत डाव्या बाजूच्या खिडकींत जाऊन उभा राहतो. अण्णासाहेबांचा आवडता विषय त्यांना मिळालेला असतो. तेव्हा ते संभाषणाचा मक्ता घेतात.)

**अण्णासाहेब :** मोठा हुशार मुलगा बरं का, गोपाळराव. आई-वडील कुणी नाहींत. एक म्हातारी चुलती आहे, तिकडे कोंकणांत. आमच्या ओळखीनं आला पहिल्यांदा मदत मागायला. मॅट्रिक झाला होता. पण पुढं शिकायची कसली होती ऐपत? तर सांगायची गोष्ट म्हणजे आम्हांला माणसांची पारख फार चांगली गोपाळराव—याला पाहिलं, आणि खूणगांठ बांधली कीं, पोरगा पुढं नांव काढणार. एकदां आमच्या मनांत आलं कीं, पैशाला मागंपुढं पाहणारे नव्हत आम्ही. त्याला सांगितलं, पैशाची काळजी करूं नकोस. अभ्यास कर आणि पुढं ये. अहो, याचं यश म्हणजे पर्यायानं आमचंच यश कीं. तर सांगायची गोष्ट म्हणजे मुलानं पैशाचं चीज केलं. एकदां म्हणून कांहीं फर्स्ट क्लास सोडला नाहीं. गेल्या वर्षी एम. ए. झाला फर्स्ट क्लासांत—लगेच लेक्चररची जागा मिळाली. चलाख आहे. आतां वर चढेल.

**गोपाळराव :** छान, छान!

**अण्णासाहेब :** एवढ्यावर काय झालंय् गोपाळराव! खरोखर या मुलाचं नशीब

उघडायचं होतं म्हणून आमच्या घरीं पाऊल ठेवलं त्यानं. हा फर्स्ट क्लासांत बी. ए. झाला तेव्हांच त्याला सांगितलं, बाबा रे आजपर्यंत तुला विद्यादान केलं. आतां तूं एम. ए. झालास कीं कन्यादानहि करणार आहे.

नंदा : इश्श, अण्णा !

ण्णासाहेब : पाहिलंत ! पोरी किती शिकल्या सवरल्या तरी लाजणं कांहीं सोडत नाहींत. अग, आत्ताची काय ओळख आहे तुझी दिवाकराशीं ? हिचा एक जगावेगळा हट्ट. म्हणे दिवाकर एम. ए. झालाय तर मी बी. ए. तरी नको का ? बरं म्हटलं—होऊन जाऊं द्या तुझ्या मनासारखं. आतां या एप्रिलमधें परिक्षेला बसली कीं बार उडवून टाकायचा बरं का गोपाळराव.

नंदा : (अधिकच लाजून) असं काय हो अण्णा ?

ण्णासाहेब : मीं या पोरीलासुद्धां सांगितलं, तुझ्यासारख्या रूपवान्, गुणवान् मुलीसाठीं छप्पन्न आय. सी. एस. आले असते लोटांगणं घालीत. तुझा बापसुद्धां त्यांच्या तोलाला कमी पडणारा नाहीं. पण आतां जमाना बदलत चालला आहे. तुम्ही मुलींनीं नवा धडा घालून दिला पाहिजे. काय ?

ोपाळराव : बरोबर आहे. बरोबर आहे.

ण्णासाहेब : आतां हेंच पहा. मीं हात दिला नसता तर हा दिवाकर कुठं कोंपऱ्यांत कोंकणच्या खेड्यांत कुजत पडला असता. सांगायची गोष्ट म्हणजे, एकेकाचं दैव असतं. नाहीं तर आमचे चिरंजीव. दोन वर्षांपूर्वी एकदोनदां गचके खाऊन एकदाचे इंटर झाले. सांगत होतों. चांगला लॉकडे जा. पण नाहीं. याचं डोकं भलतीकडेच. कॉलेजच्या पहिल्या दोन वर्षांत कवितांचीं थेरं झालीं. झाडून सगळ्या मासिकांकडे पाठवल्या. त्यांतल्या बहुतेक परत आल्या बरं का, गोपाळराव. (जोरजोरांत हसतात.)

संत : (अस्पष्ट स्वरांत) अण्णा—

ण्णासाहेब : आणि इंटरला गेल्यावर यांना एकदम कळलं कीं, आपल्याला संगीताचा शोक आहे. झालं, केली आ-ऊला सुरवात. अहो, बाप पोसायला आहे, मग काळजी कशाची ? एकुलता एक मुलगा—आम्हांला कां वाटूं नये

यानं आमचं नांव पुढं चालवावं ? पण याला कसली पर्वा आहे ! मास्तरांनीं त्याला भजनीं लावलाय् आणि हा लागलाय्–

**वसंत** : (शरमेनं आणि रागानं) अण्णा, तुम्ही मला बोलायचं असेल तें बोला. नानांना नका मधें आणूं.

**अण्णासाहेब** : याला म्हणतात गुरुभक्ति—

**नाना** : (सुनंदाला) ऊर्मिला तुझ्याकडे आली नाहीं का ग ?

**सुनंदा** : अय्या, नाहीं. आम्ही तिलाच तर बोलवायला आलों होतों. (दिवाकराला) नाहीं कां हो !

**नाना** : पण रोज बरोबर जातां ना तुम्ही फिरायला ?

**सुनंदा** : कुठलं आलंय्. तिची परीक्षा झाल्यावर एकदोन दिवस आली तेवढीच. हल्लीं आम्हीच तर जातों. म्हटलं, तिला बरंबिरं नाहीं कीं काय ? (हें बोलणं चाललेलं असतांनाच ऊर्मिला जिन्यावरून धावत वर येते. तिला थोडा दम लागलेला आहे.)

**ऊर्मिला** : नाना (ती पाहुण्यांची गर्दी पाहून थबकते.)

**सुनंदा** : शंभर वर्षं आयुष्य तुला, ऊर्मिला.

**ऊर्मिला** : काय करूं ग इतकं आयुष्य घेऊन.

(हें बोलतां बोलतांच ती पुढें होऊन दिवे लावते.)

**अण्णासाहेब** : वा ! डॉक्टरांनीं दीर्घायुषी असलं पाहिजे, ऊर्मिलाताई.

**ऊर्मिला** : अजून कांहीं मी डॉक्टर झालें नाहीं, अण्णासाहेब. रिझल्ट लागायचाय् पुढल्या आठवड्यांत—

**अण्णासाहेब** : तुम्हांला कसली आलीय रिझल्टची भीति ?

**ऊर्मिला** : कांहीं सांगतां येत नाहीं या परीक्षेचं. एक प्रॅक्टिकल चांगलं नाहीं झालं माझं.

**नाना** : कुठं गेली होतीस, अक्का ?

**ऊर्मिला** : लायब्ररींत गेलें होतें.

नाना : पाहिलंस का कोण आले आहेत आपल्याकडे ? तुझ्या गोपाळकाकांना ओळखलंस कीं नाहीं ?

ऊर्मिला : गोपाळकाका ? वा, ओळखणार नाहीं असं कसं होईल ? (उभ्यानेंच नमस्कार करीत) नमस्कार काका.

गोपाळराव : अशी इकडे ये पाहूं. तुझं नांव काय ग ?

ऊर्मिला : बघा हं काका—

गोपाळराव : खरंच, तुला मी ढब्बू पैसा म्हणत होतों तें कुणाला सांगायचं नाहीं असं ठरलं होतं नाहीं का आपलं ?

ऊर्मिला : काका !

गोपाळराव : (कौतुकानें) केवढी मोठी झालीस ग पोरी ! मागच्या वेळीं आलों होतों तेव्हां परकरी पाहिली होती तुला. इतकी चुरुचुरु बोलायची. तें दल काय, तीं तिरंगी झेंड्याचीं गाणीं काय—आणि ध्येयाचा ध्रुवतारा, कर्तव्याचं असिधाराव्रत असं कांहींतरी मला आणि तिलाहि न कळणारं बडबडत बसायची. मला वाटतं, नानाला तें सारं ऐकण्याचा कंटाळा आला असावा. काका आपले नवीन पाहुणे बरे सांपडले होते दोन महिने चांगले तावडींत, नाहीं का ग ?

नाना : तिला असं चिडवूं नकोस बरं का, गोपाळ. आतां थोड्या दिवसांत डॉक्टर होणार आहे ती. यावेळीं फायनलला बसलीय्.

ऊर्मिला : काका तेव्हांसुद्धां मला इतकं चिडवायचे ! पण हल्लीं मी मागल्या-सारखी चिडत नाहीं बरं का, काका.

नाना : गप्पा नंतर करायच्या अक्का. अगोदर आंत जाऊन चहा टाक पाहूं.

अण्णासाहेब : छे छे छे, मास्तर. आमचं सगळं झालंय्. आतां कांहीं नको.

गोपाळराव : खरंच त्रास घेऊं नकोस.

सुनंदा : तुला फिरायला घेऊन जायला आलों होतों आम्ही, ऊर्मिला. गेल्या आठ दिवसांत पत्ता कुठं आहे तुझा ? कां नाहीं आलीस ग ?

ऊर्मिला : नाहीं आलें !

सुनंदा : बरं मग, आज बरी सांपडलीस. चल ना—थोडंसं फिरून येऊं.

ऊर्मिला : आत्तां?

दिवाकर : चला ना—

ऊर्मिला : (अडखळत) नको ग आतां—मी फार दमून आलेंय्. थोडंसं संध्याकाळचंहि करायचंय्. आणि त्यांतून काका आले आहेत. काका थांबणार आहेत ना जेवायला?

नाना : नाहीं—ते उतरले आहेत अण्णासाहेबांकडे. पण बसतील ते थोडा वेळ. तुला जायचं असलं तर जा जरा पाय मोकळे करून ये.

उर्मिला : नको, नको. नाहींच येत मी.

सुनंदा : बरं बाई, तुझी मर्जी. जेवढी विनवणी करावी तेवढा जास्तच मान येतो.

ऊर्मिला : मान नाहीं ग—

सुनंदा : नाहीं तर काय? तुझं नेहमींचंच असतं असं. चला हो—आपणच जाऊं या. फुकट इतका वेळ वाट पाहिली.

दिवाकर : बराच उशीर झालाय आतां. मला वाटतं, थोडा वेळ इथंच थांबून नंतर निघूं या आपण. तुला घरीं सोडून मी खोलीवर जाईन मग.

सुनंदा : मला ज्या दिवशीं फिरायला जावंसं वाटतं, त्या दिवशीं नेमकं सगळ्यांना घरीं बसावंसं वाटतं. तें कांहीं नाहीं. आज आपण जायचंच फिरायला—चला म्हटलं ना.

अण्णासाहेब : दिवाकर, अरे जा बाबा! उगीच कशाला तिला नाराज करतोस?
(दिवाकर कांहीं न बोलतां उठतो. तो आणि सुनंदा तुटकपणानें निरोप घेऊन जातात. ऊर्मिलाहि चटकन् स्वयंपाकघरांत जाते.)

अण्णासाहेब : गोपाळराव, मला वाटतं, आपणहि निघावं आतां.

गोपाळराव : तुम्ही व्हा पुढं हवे तर. मी येतोंच थोड्या वेळांत.

अण्णासाहेब : (नाखुषीनें उठत) असं म्हणतां? बरं, कांहीं हरकत नाहीं. पण आठ वाजेपर्यंत या बरं का. सगळी मंडळी वाट पहात राहतील तुमची. येतों तर मग मी. (अण्णासाहेब जातात. गोपाळराव आणि नाना थोडा वेळ स्तब्ध राहतात. दोघांनाहि अवघडल्यासारखं होतं.)

**नाना** : फार घाईत आलास गोपाळ.

**गोपाळराव** : तर काय. अरे या व्यवसायांत फुरसद म्हणून कशी ती मिळत नाहीं. (पुन्हा थोडा वेळ स्तब्धता)

**नाना** : (प्रयासानें) गोपाळ, चल बाहेर येतोस का जरा, मला रामाला जायचं आहे. इथं कोपऱ्यावरच आहे देऊळ. तेवढंच फेरी मारल्यासारखंहि होईल.

**गोपाळराव** : वा जरूर जाऊं या—(जुन्या आठवणीनें हंसून) आपण मॅट्रिकला असतांना मारुतीला केलेला नवस आठवतो का नाना? (नाना हंसतात) हल्लीं मारुतिभक्त नाहींस वाटतं तूं?

**नाना** : वयाबरोबर देवहि बदलतात माणसांचे. बरं चल, जाऊन येऊं या आपण. अक्का, (ऊर्मिला बाहेर येते) जास्त कांहीं करण्याच्या भानगडींत पडूं नकोस हं. नुसता भात टाकलास कीं भागेल. आम्ही आलोंच थोड्या वेळांत.

(ते दोघे जातात. ऊर्मिला त्यांच्यामागें दार लावते. आणि आपल्याच तंद्रींत स्वयंपाकघराकडे जायला वळते. खिडकीपाशीं उभ्या असलेल्या वसंताकडे तिचं लक्षच जात नाहीं. तो पुढें येतो.)

**वसंत** : ऊर्मिला—

(ऊर्मिला दचकून थबकते. तिच्या चेहेऱ्यावर अपराधीपणाची छटा दिसते.)

**ऊर्मिला** : वसंत—

**वसंत** : विसरलीस ना मी इथं आहें तें?

(ऊर्मिला मानेनेंच 'नाहीं' म्हणते.)

**वसंत** : जाणून बुजून टाळलं असतंस तर कदाचित् इतकं वाईट वाटलं नसतं मला. पण तूं विसरूनच गेलीस!

**ऊर्मिला** : (हळुवारपणानें) फार वेळ वाट पाहिलीस माझी?

**वसंत** : वेळाचं काय आहे? जितक्या तीव्रतेनं वाट पहावी, त्याच्यावरच असतं सारं...आज आठ दिवस झाले तुला भेटून.

**ऊर्मिला** : (थोडा वेळ स्तब्ध राहून) जरा एक मिनिट थांबतोस का? मी तांदूळ घेऊन येतें निवडायला.

**वसंत** : (दुखावलेल्या नजरेनें तिच्याकडे पाहून) हं—

(ऊर्मिला तांदूळ आणते. वसंत कांहींच न बोलतां फेऱ्या घालीत राहिला आहे.)

**ऊर्मिला** : काय झालं ?

**वसंत** : नेहमींचंच ग—

**ऊर्मिला** : कांहीं बोलले का अण्णा ?

**वसंत** : त्यांनीं काय शिल्लक ठेवलंय बोलायचं ? मला सराव झाला आहे त्याचा. पण आज—

**ऊर्मिला** : काय झालं ?

**वसंत** : आज नानाहि खूप तोडून बोलले. आणि अण्णा कुठल्याहि परक्या माणसासमोर मनाला येईल तें बोलतात. आज त्या गोपाळरावांसमोर सगळा पाढा वाचला त्यांनीं.

**ऊर्मिला** : हं—

**वसंत** : (एकदम वैतागानें) मला नाहीं सहन होत आतां हें, ऊर्मिला. आयुष्याचा कंटाळा आलाय्. वाटतं, जीव द्यावा आणि सगळ्या मनस्तापांतून मोकळं व्हावं—

**ऊर्मिला** : (अधिकारी स्वरांत) असलं कांहीं बोलायचं नाहींस तूं वसंत. ज्यांना करायचं असतं ते बोलत नाहींत.

**वसंत** : मला माहीत आहे तें. मी दुबळा आहें, भित्रा आहें. जगायचं सुद्धां धैर्य माझ्याजवळ नाहीं; मग मरायचं धैर्य कुठून येणार ?

**ऊर्मिला** : पण कशाला मरायचं ? लोक नालायक म्हणतात म्हणून ? लोक अपयशी ठरवतात म्हणून ?

**वसंत** : लोकांच्या बोलण्याचं कांहीं वाटत नाहीं मला ऊर्मिला. पण माझं मलाच कळतं. माझ्या जगण्याला कसलाच अर्थ नाहीं.

**ऊर्मिला** : तुला एक सांगू का वसंत ? जोंपर्यंत तूं स्वतःशीं प्रामाणिक आहेस तोंपर्यंत दुसऱ्या कशाचीच पर्वा करण्याचं तुला कारण नाहीं. मला सांग, तुला गाणं अतिशय आवडतं ना ? तुला जी गोष्ट मनापासून हवीशी वाटते तिच्याकरतां तूं प्रयत्न करतो आहेस. खरं कीं नाहीं ? झालं तर—

**वसंत** : (उद्वेगानें) ऊर्मिला, हें सगळं ढोंग आहे ग. सगळं वरवरचं आहे.

**ऊर्मिला** : म्हणजे? तुला गाणं आवडत नाहीं असं सांगणार आहेस कीं काय तूं मला?

**वसंत** : आवडतं पण—पण—

**ऊर्मिला** : काय वसंत?

**वसंत** : (आवेगानें) त्याहिपेक्षां तूं आवडतेस. तूं हवीशी वाटतेस. (दाटलेल्या आवाजांत) तूं जिथं वावरतेस तिथं असावंसं वाटतं, म्हणून नानांकडे शिकायला येतों. तूं बोलतेस तें ऐकावंसं वाटतं; म्हणून असा तासन् तास तिष्ठत राहतों. नाना मला एकीकडे गाणं शिकवीत असतात आणि मी—मी नुसतं मनांत तुझं नांव घोळवीत राहतों. (डोळे मिटून) ऊर्मिला—ऊर्मिला—ऊर्मिला—

**ऊर्मिला** : मला कळत नाहीं तूं काय बोलतोस तें—

**वसंत** : तुला नाहीं कळायचं!—तूं अनुभवलेलं नाहींस तें. तुला त्याचा स्पर्श कधींच झाला नाहीं.

**ऊर्मिला** : (कुठेंतरी पहात) खरंच का?

**वसंत** : असं बोलायचं नाहीं म्हणून तूं सांगितलं आहेस, तरीहि मी बोलतों—पुन्हा पुन्हा बोलतों. मला माझी भावना मारतां येत नाहीं ऊर्मिला, मला तुझ्यापासून दूर जाववत नाहीं.

**ऊर्मिला** : पण तूं कां असा जिवाला त्रास करून घेतोस? मी तुला वचन दिलंय्, हें विसरलास तर नाहींस?

**वसंत** : कशाला—कशाला असं वेड्यासारखं वचन देऊन बसलीस? तुझ्या आणि माझ्याहि दुबळेपणाच्या क्षणीं—नाहीं, ऊर्मिला, तें व्हायचं नाहीं. मी तुला त्या वचनांतून मोकळं करतों. माझ्या मातीमोल आयुष्याशीं तुला बांधून ठेवायचं नाहीं मला.

**ऊर्मिला** : वेडा कुठला! तूं मला असं कां भासवतोस रे, कीं मी फार मोठा त्याग करत्येंय्?

**वसंत** : (विकलपणानें हसून) तूं माघार घ्यायची नाहींस, हें मला माहीत

आहे. तुझ्या शक्तीची मला कल्पना आहे, ऊर्मिला. पण मला तुझी शक्ति नको आहे ग, मला—मला तुझं प्रेम हवं आहे. ऊर्मिला, एकदां—एकदांच सांग कीं, तुझं माझ्यावर प्रेम आहे—

ऊर्मिला : (गंभीरपणानें) मला माहीत नाहीं. वसंत, मला तूं फार आवडतोस. तूं माझ्याकरतां जें कांहीं केलंस—

वसंत : त्या उपकाराच्या आणि कृतज्ञतेच्या गोष्टी बोलून मला दुखवूं नकोस. सांग, माझ्यावर तुझं प्रेम आहे का ?

(ऊर्मिला कांहींच बोलत नाहीं. वसंत उद्वेगानें दोन्ही हातांत तोंड लपवितो. ऊर्मिला ताट बाजूला ठेवून त्याच्याजवळ जाते. त्याचे दोन्ही हात हातांत घेते.)

ऊर्मिला : वसंत, तुझा माझ्यावर विश्वास आहे ना ? बघ—इकडे बघ— (त्याच्या केसांतून हात फिरवीत) असं निराश नाहीं व्हायचं.

(वसंत तिच्याकडे दोन क्षण बघतो. हळूहळू त्याचा आवेग मंदावतो.)

ऊर्मिला : जरा शांत झालास का ?

(वसंत मानेनेंच हो म्हणतो. इतक्यांत जिन्यावर पावलें वाजतात. ऊर्मिला आणि वसंत दूर होतात. गोपाळराव आणि नाना बोलत बोलत आंत येतात.)

गोपाळराव : म्हटलं, इतक्या स्वस्तांत मिळतोय् तर घेऊन टाकावा बंगला. मला तर भारी पसंत पडलाय्. तुलासुद्धां आवडेल. नाना, तूं ये ना एकदां नागपूरला. कधीं येणार, आत्तांच सांग.

नाना : बघूं सावकाश. घाई काय आहे !

वसंत : ऊर्मिला, मी जातों आतां.

नाना : तूं बसला होतास हो रे, वसंत ? आज घ्यायला झालं नाहीं मला. उद्यां संध्याकाळीं ये रोजच्याप्रमाणें—

वसंत : पण उद्यां रविवार ना, नाना ?

नाना : रविवार असला म्हणून काय झालं ? फार तर अगदीं घड्याळाच्या ठोक्याबरोबर नको येऊंस.

ऊर्मिला : चल, वसंत. मी येतें तुझ्याबरोबर थोडी. नाना, जाऊं ना ?

**नाना :** जा—पण लवकर परत ये हो. उशीर झालाय् बराच.

**ऊर्मिला :** हो, नाना.

(ऊर्मिला आणि वसंत जातात. नाना विचारमग्न अवस्थेंत थोडा वेळ स्तब्ध राहतात).

**गोपाळराव :** नाना—

**नाना :** (दचकल्याप्रमाणें) अं ?

**गोपाळराव :** कसला एवढा विचार करतो आहेस तूं मघांपासून ?

**नाना :** (हंसण्याचा प्रयत्न करीत) कुठं ? कांहीं नाहीं—

**गोपाळराव :** तर काय ? माझी सारखी बडबड चाललीय् आणि तूं मात्र अगदीं गप्प गप्प आहेस. मला एवढंसुद्धां कळत नाहीं का ?

**नाना :** काय सांगूं गोपाळ ! अरे या संसाराच्या कांहीं कर्मकटकटी. चालायूचंच. रोजचंच असतं तें. बरं, तूं बस पाहूं जरा स्वस्थपणें. मी हा आत्तां जरा हातपाय धुवून आलों—

(नाना आंत जातात. गोपाळराव खोलींत फेऱ्या घालतात. इतक्यांत दिवाकर घाईघाईनें आंत येतो. तो गोपाळरावांना पाहून दचकतो.)

**गोपाळराव :** अरे परतसे आलांत ? कांहीं राहिलं कीं काय ?

**दिवाकर :** (चांचरत) तसं कांहीं नाहीं. सुनंदाला घरीं सोडून कॉलेजवर चाललों होतों. सहज आठवण झाली. एक पुस्तक राहिलं होतं ऊर्मिलाताई-कडे. म्हटलं, जातां जातां घेऊन जावं—

(इतक्यांत नाना टॉवेलला हात पुशीत बाहेर येतात.)

**नाना :** काय दिवाकर ?

**दिवाकर :** (ऊर्मिलेच्या खोलीकडे जात) ऊर्मिलाताई खोलींत आहेत ना ?

**नाना :** नाहीं. आत्तांच फिरायला गेली ती वसंतबरोबर.

**दिवाकर :** फिरायला गेल्या ?

**नाना :** येतील इतक्यांत. कांहीं काम होतं का ?

**दिवाकर :** नाहीं—आपलं एक पुस्तक न्यायला आलों होतों.

**नाना :** कसलं पुस्तक ?

दिवाकर : तें—हें—आमच्या लायब्ररीचं दिलं होतं एक त्यांना वाचायला.

नाना : इतक्या घाईनं हवं असलं तर जा ना बघा तिच्या ग्लोलींत. घ्या शोधून—

दिवाकर : नको नको. तशी कांहीं घाई नाहीं. पुन्हा येऊन जाईन कधीं तरी. बरं, येतों मी.

(दिवाकर घाईनें निघून जातो. नाना आपल्याशींच कांहीं तरी गुणगुणत खुर्चीवर बसतात.)

गोपाळराव : नाना—

नाना : काय गोपाळ !

गोपाळराव : अशी टाळाटाळ नको करूंस. कसला भार आहे तुझ्या मनावर ?

नाना : (हंसून) मीं सांगितल्याशिवाय तुला अगदीं चैनच पडायचं नाहीं का ?

गोपाळराव : (थोड्याशा खिन्नपणानें) तुला कांहीं झालं तर विचारपूस करायला नेहमीं कांहीं मी इथं नसतों, नाना. एके काळीं दिवस अन् रात्र एकमेकांच्या सहवासांत रहात होतों. एकाला कांटा बोचला तर दुसऱ्याच्या डोळ्यांत पाणी यावं अशी मैत्री होती आपली. आणि आज पहावं तर मला आपलं एकदम् 'अहो–जाहो' करायला सुरवात केलीस. आतां हा असा तुटकपणांत वागत आहेस. मी हीं मधलीं वर्षे विसरू शकलों, पण तुला विसरतां येत नाहींत.

नाना : वर्षांचा प्रश्न नाहीं गोपाळ. आपलीं मनंच फार दुरावलीं आहेत.

गोपाळराव : कां ? असं कां म्हणतोस ?

नाना : कसलं साम्य आहे आपल्यामधें ? तूं तुझ्या आयुष्याचं चीज केलं आहेस. जें मिळवण्यासारखं असतं तें सगळं तूं मिळवलं आहेस. आणि मी —आतां आयुष्याच्या उतरणीला लागलों, तरी कसली शाश्वति नाहीं, कसली स्थिरता नाहीं. परिस्थितीचे टोले खात, डळमळत, ठेंचाळत, रें रें करीत गाडं चाललंय कसंबसं—

गोपाळराव : कशामुळं जाणवलं तुला हें ?

**नाना** : कशामुळं ? पुष्कळ गोष्टी झाल्या. संध्याकाळच्या क्लासमधलीं दोन मुलं आजपासून येणार नाहींत. चाळीस रुपये येण्याचे थांबले. त्यामुळं किती गोष्टी अडल्या, हें तुला कळणं शक्य नाहीं.

**गोपाळराव** : फार अडचणींत आहेस का तूं? मीं कांहीं—

**नाना** : (तीव्रतेनें) नको!

**गोपाळराव** : पण काय झालं? मी कुणी परका आहें का?

**नाना** : नको. उसने घेण्याइतकी हलाखी आलेली नाहीं अजून.

**गोपाळराव** : माफ कर, नाना. तूं अतिशय मानी आहेस, हें क्षणभर विसरलों होतों मी.

**नाना** : ती एकच गोष्ट मोलाची असते आमच्याजवळ? (हंसतात.)

**गोपाळराव** : कधीं कधीं विचार करतांना मला वाटतं, नाना, तूं बी. ए. व्हायला पाहिजे होतास.

**नाना** : आणि कुठं तरी खर्डेघाशी करीत बसायला पाहिजे होतं, असंच ना? नाहीं, गोपाळ, माझ्या प्रकृतीला तें मानवण्यासारखं नव्हतं. आणि माझ्या उद्वेगाच्या बोलण्यावरून मला पश्चात्ताप होतोय असं जर तुला वाटत असेल तर तें अगदीं चुकीचं आहे.

**गोपाळराव** : या सगळ्या गोष्टींचा मी जेव्हां जेव्हां विचार करतों तेव्हां तेव्हां मला ती जलशाची रात्र आठवल्याशिवाय रहात नाहीं. त्या खाँसाहेबांना केवढ्या इतमामानं कॉलेजांत आणलं. आणि कांहीं केल्या त्यांचा आवाज लागेना. शेवटीं आम्हीं सगळ्यांनीं तुला आग्रह केला. इतकीं वर्षं उलटून गेलीं, नाना. पण तुझ्या त्या दिवशींच्या गाण्यानं आलेली धुंदी मला अजून आठवते. ते खाँसाहेब तर नागासारखे डोलायला लागले. गाणं संपल्याबरोबर ते तुला म्हणाले, "बेटा, तेरी आवाज़ दुनियाको पागल कर देगी—" आठवतं ना नाना?

**नाना** : मी कसं विसरेन, गोपाळ!—पहांटेला तुम्ही सगळीं परतलांत आणि तुला चुकवून मी एकटाच कुठंतरी दूर भटकायला गेलों. त्या दिवसापर्यंत मला गाण्याची नुसती विलक्षण ओढ होती पण त्या दिवशीं मी गाण्याकरतां वेडा झालों, गोपाळ—

गोपाळराव : दुसऱ्या दिवशीं आपला सांगायला लागलास कीं, मी कॉलेज सोडून देणार आहें, आणि खाँसाहेबांकडे गाणं शिकायला राहणार आहें. तुला कल्पना नाहीं यायची नाना; अरे—मी आश्चर्यानं नुसता सुन्न झालों, किती परोपरीनं समजावलं तुला. पण तुझा निश्चय कांहीं ढासळला नाहीं.

नाना : सगळ्या आयुष्याचा ओघच्च बदलून गेला त्या दिवशीं.

गोपाळराव : कितीतरी दिवस एक प्रश्न विचारावासा वाटत होता, नाना. इतक्या घाईनं तो निर्णय घेण्यांत आपण चूक केली, असं तुला कधीं वाटून गेलं का रे ?

नाना : नाहीं, गोपाळ, मला पुन्हा हें आयुष्य दिलं तरी मी तें असंच जगेन. या संगीताची आराधना करतांना मीं असे कांहीं क्षण अनुभवले आहेत कीं त्यांवरून सारीं लौकिक सुखं ओवाळून टाकावीं. कलेची मीं खरोखर कांहीं सेवा केली किंवा नाहीं मला माहीत नाहीं. मीं फक्त एकच केलं, आणि तें म्हणजे मीं स्वतःची फसवणूक केली नाहीं.

गोपाळराव : मघाशीं इतक्या कडवटपणानं कां बोलत होतास मग ?

नाना : तेंहि कांहीं प्रसंग असतात. प्रत्यक्ष परिस्थितींत हें ध्येयाचं काव्य वगैरे कांहीं नसतं. नाहीं म्हटलं, तरी तिच्या चटक्यांनीं माणूस हैराण होतो. अगदीं टणक झालेलं मनसुद्धां अण्णासाहेबांसारख्यांच्या टोमण्यांनीं व्यथित होतं. आपल्या एके काळच्या मित्राला आपल्यासारख्या गरिबाच्या घरीं उतरावंसं वाटत नाहीं, या विचारानं उदास होतं.

गोपाळराव : नाना—

नाना : (हंसून) जाऊं दे, गोपाळ. कधीं कधीं मनाविरुद्ध शिष्टाचारांत गुंतावं लागतं. (हें बोलणं चाललेलं असतांनाच ऊर्मिला येते. दोघे मित्र बोलण्यांत गर्क झालेले पाहून हळूच स्वयंपाकघरांत निघून जाते.)

गोपाळराव : नाना, तूं माझ्याशीं बोललास याचं इतकं समाधान वाटतंय् मनाला.

नाना : मलाहि मनावरचा भार उतरल्यासारखा वाटतोय्.

गोपाळराव : सगळ्या गलबल्यांतून सुटून एकदां पुण्याला यावं अशी ओढ लागून राहिली होती. मनाला कसली तरी रुखरुख वाटते, नाना.

**नाना** : कसली रुखरुख ?

**गोपाळराव** : माझं हें सगळं लौकिक यश म्हणजे एक मोठं थोरलं अपयशच आहे, असं वाटतं मला कधींकधीं. मला नेहमींच्या चाकोरींतून चालायचं नव्हतं. कांहींतरी वेगळं करायचं होतं. पण हळूहळू व्यवहाराच्या चक्रानं आपले दांत माझ्या आयुष्यांत रोवले. मी त्याच्याबरोबर गरगर फिरूं लागलों. व्यवहार—व्यवहार—त्याच्या गलबल्यांत मनाचा अस्फुट विरोध विरून गेला. मनाच्या क्रिया-प्रतिक्रिया ठरून गेल्या. नाना, हें चक्र कधींच थांबणार नाहीं का रे?

**नाना** : मी काय सांगूं गोपाळ ?

**गोपाळराव** : अगदीं निकराचा प्रयत्न करून स्वतःभोवतीं असलेल्या या कोंडींतून बाहेर पडावं असं वाटतं कधींकधीं.

(ऊर्मिला सरबताचे पेले घेऊन बाहेर येते.)

**नाना** : तूं केव्हां आलीस ग अक्का.

**ऊर्मिला** : झाला थोडासा वेळ. दोघे मित्र गप्पांत इतके गुंगले होते; तुमच्या लक्षांत कुठून यायला ?

**गोपाळराव** : आणि हें कशाला आणलंस ? माझी निघायचीच वेळ झाली होती.

**ऊर्मिला** : घरीं आलेल्या पाहुण्याला निदान गुळपाणी तरी दिल्याशिवाय परत जाऊं द्यायचं नसतं, काका.

**गोपाळराव** : मोठी चलाख आहे हं तुझी पोर.

**नाना** : तर ! तिच्या आईचं वळणच होतं तसं. तिनं स्वतःहि कधीं कामाला मागंपुढं केलं नाहीं, आणि मुलीलाहि करूं दिलं नाहीं. कधींकधीं आश्चर्य वाटतं कीं माझ्या गरीबाच्या भाग्याला हीं दोन रत्नं कशीं आलीं. ती होती तेव्हां—

**ऊर्मिला** : (मधेंच) नाना, सरबत घेतां ना तुम्ही ?

**नाना** : हो, हो, आण.

(ती त्या दोघांना पेले देते)

**गोपाळराव** : तूं नाहीं का ग घेत ?

ऊर्मिला : मला नको आतां, काका.

नाना : अग अक्का, बरी आठवण झाली. ते दिवाकर आले होते तुझ्याकडे.

ऊर्मिला : दिवाकर ? केव्हां ?

नाना : तूं वसंताबरोबर फिरायला गेली होतीस ना, तेव्हां.

ऊर्मिला : कशाला आले होते ?

नाना : त्यांना कसलंसं पुस्तक हवं होतं.

ऊर्मिला : माझ्याकडे नाहीं बाई त्यांचं कसलं पुस्तक.

नाना : ते म्हणाले खरे. मीं त्यांना सांगितलं, फिरायला गेली आहे. आत्तां पांच मिनिटांत येईल. बसा थोडा वेळ. पण ते कसचे थांबतात ! पुन्हा येईन म्हणाले.

ऊर्मिला : मी फिरायला गेलें असं सांगितलंत त्यांना नाना ?

नाना : हो, कां ग ?

ऊर्मिला : कांहीं नाहीं, सहज—

गोपाळराव : आतां एम. बी. बी. एस. झाल्यावर काय करण्याचा बेत आहे अक्काचा ?

नाना : (सुस्कारा सोडून) हं, बघायचं आतां. इथवर पार पडलं, म्हणजे गंगेंत घोडे न्हाले. आतांपर्यंत मला शिक्षणाचा एक पैही खर्च पडूं दिला नाहीं तिनं. सगळं स्कॉलरशिपवर शिक्षण झालं तिचं. तरी मधें आजारी होती म्हणून सहा महिने वाया गेले. अशी बुद्धिवान् मुलगी असती तर एखाद्या बापानं फॉरिनला पाठवली असती. जिथं इच्छा आहे तिथं ऐपत नाहीं आणि जिथं ऐपत आहे तिथं इच्छा नाहीं.

ऊर्मिला : पण नाना, मला तुम्हांला सोडून फॉरिनला जायचंच नाहीं.

गोपाळराव : वा ग वा ! अगदी गोष्टींतली बिबीच कीं नाहीं. म्हणे, नानाला सोडून जायचं नाहीं. तुम्हीं तरुण मुलींनीं अगदीं खूप शिकलं पाहिजे. परदेशांतलं जितकं ज्ञानभांडार लुटून आणतां येईल, तितकं आणलं पाहिजे. काय ?

**नाना** : (खिन्नपणानें) तूं काय तिला भित्री समजतोस, गोपाळ? तिची लहानपणापासूनची महत्त्वाकांक्षा आहे तिकडे जाऊन उच्च शिक्षण घेण्याची. पण दरिद्री बापाच्या पोटीं जन्म घेण्याचं पाप केलंय् ना तिनं. जरी तिला एखादी स्कॉलरशिप् मिळाली तरी तेवढ्यावर भागणार आहे थोडंच. खर्चाची सोय झाली तर—

**ऊर्मिला** : (अनपेक्षित तीव्रतेनें) तरी मी जाणार नाहीं, नाना. मला फॉरिनला जायचं नाहीं.—कधीं—कधींच जायचं नाहीं. (ती झटकन पेले उचलून आंत जाते. थोडा वेळ स्तब्धता.)

**नाना** : (दाटलेल्या आवाजांत) फार समजूतदार आहे माझी अक्का. मला वाईट वाटेल म्हणून हा विषयहि काढीत नाहीं कधीं.

(पुन्हा थोडा वेळ स्तब्धता.)

**गोपाळराव** : उटतों मी आतां, नाना.

**नाना** : हो, अण्णासाहेब वाट पहात असतील नाहीं? पण थोडा वेळ थांब. शनिवारीं भजन करतों मी. तेवढं झाल्यावर जा.—आतां परत कधीं येशील इकडच्या बाजूला, कधीं भेट होईल, राम जाणे! अक्का, अग भजनाची वेळ झाली बरं का—

**ऊर्मिला** : (आंतून) आलें, नाना—(ऊर्मिला उदबत्त्या घेऊन येते. दोन्ही तसबिरींजवळ लावते. नाना तंबोरा काढूं लागतात. नंतर बैठकीवर बसून तंबोरा लावतात.)

**गोपाळराव** : (ऊर्मिलेला एकीकडे) ऊर्मिला—

**ऊर्मिला** : काय काका?

**गोपाळराव** : उद्यां सकाळीं वेळ आहे का तुला?

**ऊर्मिला** : हो, कां?

**गोपाळराव** : माझं काम आहे थोडं तुझ्याशीं. साधारण साडेआठ पावणे-नऊच्या सुमाराला अण्णासाहेबांकडे ये. चालेल ना?

**ऊर्मिला** : जरूर येईन, काका. पण माझ्याशीं कसलं काम आहे तुमचं?

**गोपाळराव** : कांहीं नाहीं. चक्रांतून निसटतां येतं का मला, तें पाहणार आहें मी.

**ऊर्मिला :** असं काय गूढ बोलतां काका ?

**गोपाळराव :** आतां नाहीं उद्यां सकाळीं सांगेन. यायला मात्र विसरूं नकोस.

(नानांचा तंबोरा लावून झालेला असतो. त्यांचा शुद्ध खुला सूर तंबोऱ्याच्या नादांत मिसळतो. उर्मिला आणि गोपाळराव दोघेंहि हळूहळू खालीं बसतात. नाना भजनाला सुरवात करतात.)

लागो जीवनाचा लय रामराया तुझ्या पायीं
नाम तुझें निरंतर राहो नांदत हृदयीं —१—
तुझी सुलक्षण मूर्ती सदा पाहूं दे लोचन
तुझे गुण आळवितां वाणी होऊं दे पावन —२—
दिलें वचन पाळाया सुख-सोहळे सोडले
केलीं वल्कलें धारण राम वनवासी झाले —३—
तुझें अगाध चरित्र मनीं मावतां मावेना
एक तेजाचा किरण देई हीच रे प्रार्थना —४—

प ड दा

# २

अण्णासाहेबांच्या घरांतला दिवाणखाना. एकंदर मांडणी अण्णासाहेबांच्या इतमामाला शोभेल अशीच आहे. मागच्या बाजूला आंत येण्याचा दरवाजा आहे. त्यावर लावलेल्या झिरझिरीत पड्द्यांतून बाहेरच्या व्हरांड्याचा आणि पलीकडील बागेचा थोडासा भाग अस्पष्टपणें दिसत आहे. डावी-उजवीकडे घराच्या अंतर्भागांत जाणारे दरवाजे आहेत. उजव्या हाताला वर जाण्यासाठीं एक जिना आहे.

दुसरे दिवशीं रविवारची सकाळ. अण्णासाहेब पेपर वाचीत बसले आहेत. सुनंदा वेणीला रिबन लावीत जिन्यावरून खालीं येते. रेडियोजवळ जाऊन थोडी खुडबुड करते. तिच्या पसंतीचा कार्यक्रम तिला मिळत नाहीं. शेवटीं चिडून रेडियो बंद करते.

**अण्णासाहेब** : (पेपरांतून डोकें वर काढून) काय नंदुताई, नाहीं का चांगला प्रोग्रॅम कुठं ?

**सुनंदा** : इश्श ! जिथं जिथं आपलं पक्के गाने ! कुठं म्हणून चांगल्या रेकॉर्ड्स नाहींत. मला अगदीं आवडत नाहीं तें रेकणं.

**अण्णासाहेब** : (आपल्या नादांत) हं—

**सुनंदा** : (लाडिकपणानें) अण्णा—मीं लताच्या त्या नव्या दोन रेकॉर्ड्स घेऊं का विकत अण्णा ? काल रेडियोवर लागल्या होत्या ना, तेव्हां मला फार आवडल्या होत्या. घेऊं का अण्णा ?

**अण्णासाहेब** : कशाला नव्या रेकॉर्ड्स पाहिजेत आतां ? परवां तर घेतल्यास चार. जुन्या झाल्या कीं कचरा होतो त्यांचा. चांगला रेडियो आहे—नवीन गाणीं लागतात—

**सुनंदा** : (मुसमुसत) हो, तुमचं नेहमीं असंच असतं. कधीं आम्ही तुम्हांला

विचारीत नाहीं. आणि एकदां कधीं विचारलं कीं, तुम्ही नाहीं म्हणतां. (गंगा यमुनाहि आल्या वाटतं ?) आमच्या शब्दाला म्हणजे मानच नाहीं.

**अण्णासाहेब :** अग, अग, पण—रडायला काय झालं? काय तुम्ही पोरी—आतां सहा महिन्यांनीं लग्न झालं कीं तूं प्रोफेसरीण होणार. आणि एवढ्या तेवढ्या गोष्टीवरून रडतेस ग काय ?

**सुनंदा :** चला—(हुंदके जरा अधिकच जोरानें येतात.)

**अण्णासाहेब :** (विरघळून) बरं, बरं—जा आण तुला काय हवं तें. पण डोळे पूस बरं आधीं.

**सुनंदा :** खरंच? (तिचा चेहरा हंसरा होतो.) खरंच अण्णा? अण्णा, तुम्ही कित्ती कित्ती चांगले आहांत हो. आज संध्याकाळीं जाऊं का आम्ही?

**अण्णासाहेब :** (किंचित् उपहासानं) सकाळींच जा ना का आत्तां—

**सुनंदा :** नाहीं हो पण अण्णा, आज आम्ही मॉर्निंग शोला जाणार आहोंत. कालच सांगून ठेवलंय मीं दिवाकरांना. (एखादं गुपित सांगितल्याप्रमाणें) आणि बरं का अण्णा, काल त्यांना म्हटल ना मीं, उद्यां जेवायला या म्हणून, तर मला म्हणतात कसे, तूंच ये उद्यां आमच्या क्लबांत जेवायला. मीं हो कसं जायचं अण्णा? सगळीं चहाटळ पोरं असतात तिथं—

**अण्णासाहेब :** पण मीं त्याला पहिल्यापासून सांगून ठेवलंय् कीं दर रविवारीं जेवायला इथं यायचं. घरीं कुणी येतात–जातात, तेवढीच ओळख होते माणसाची. त्यांतून खाणावळींत का आमच्या घरच्यासारखं जेवण मिळणार आहे? कंटाळा येतो माणसाला रोज तेंच तेंच जेवून—

**सुनंदा :** ते म्हणतात, मला नाहीं कंटाळा येत. इश्श, त्यांचं आपलं कांहीं तरीच बरं का अण्णा. काय म्हणे फुकट तर नाहीं ना जेवत तिथं—

**अण्णासाहेब :** (एकदम चिडल्याप्रमाणें) फार सरळ डोकं चालतं तुझ्या दिवाकराचं.

**सुनंदा :** तसं नाहीं, अण्णा—

**अण्णासाहेब :** कांहीं सांगूं नकोस मला. पाहून ठेवलंय् मीं हल्लीं त्याचं. सदा पहावं तेव्हां कपाळाला आंठ्या, सदा कुरठलेला. दुसरं कांहीं नाहीं, पण

जाणीव ठेवायला पाहिजे माणसानं. जसं त्याला मदत करायची संधि देऊन त्यानंच आमच्यावर उपकार केले आहेत.

सुनंदा : अण्णा, तुम्ही त्यांना असं सारखं सारखं बोलूं नका हो. त्यांना किनई फार वाईट वाटतं.

अण्णासाहेब : तूंहि लागलीस वाटतं त्याची बाजू घेऊन बोलायला. त्यानं दिलं असेल तुझ्या मनांत नाहीं नाहीं तें भरवून—

सुनंदा : नाहीं, अण्णा. ते माझ्याशीं कधीं एका चकार शब्दानं बोलले नाहींत. ते बोलायचे नाहींत तसे. पण मला कळतं—

अण्णासाहेब : एकदां सुनावणार आहें मी त्याला दणकून. वठणीवर आणलं पाहिजे एकदां चांगलं.

सुनंदा : नाहीं, नाहीं, अण्णा. तुम्ही त्यांच्यावर रागवायचं नाहीं मुळींच. मला—मला त्यांची कधीं कधीं फार भीति वाटते.

अण्णासाहेब : वेडी कुठली ! बरं तें बघूं मग. जा पाहूं, जरा घरांत विचारून ये मंडई काय काय आणायची तें.

सुनंदा : मी नाहीं, अण्णा ! रामाला सांगा ना. आणि किती वाजले ! अय्या साडेआठ. एक तास तरी नको का मला तयार व्हायला. उशीर झाला तर दिवाकरांना मुळींच खपायचं नाहीं. (डावीकडच्या दाराजवळ जाऊन) रामा, ए रामा, अरे माझं पाणी काढ लवकर. जातें बरं का मी, अण्णा.

(सुनंदा धावतच वर निघून जाते. तेवढ्यांत गोपाळराव आणि त्यांच्या मागोमाग वसंत प्रवेश करतात. वसंत वर्तमानपत्र घेऊन वाचायला लागतो.)

अण्णासाहेब : काय गोपाळराव, स्नान वगैरे झालं ठीक ?

गोपाळराव : हो, अगदीं व्यवस्थित.

अण्णासाहेब : काय येणार का मंडईत आमच्याबरोबर ?

(वसंत वर्तमानपत्र ठेवून बाहेर जायला लागतो.)

अण्णासाहेब : (त्याच्याकडे वळून) आपली स्वारी कुठं चाललीय् ?

वसंत : (खालच्या मानेनें) जरा मित्राकडे जाऊन येतों.

**अण्णासाहेब** : जेव्हां पहावं तेव्हां मित्राकडे. मित्र तरी किती आहेत, देव जाणे. पाहिलंत गोपाळराव, घरचं एक काम व्हायचं नाहीं मुलाच्या हातून. पण लष्कराच्या भाकरी बडवायला सांगा. हे अगदीं एका पायावर तयार. भलेपणा मिळतो ना! त्या मास्तरांची बायको आजारी होती तेव्हां असंच. रात्रंदिवस जागरणं केलीं. कॉलेज नाहीं, अभ्यास नाहीं. शेवटीं नापास झाला. पण तिथं वाहवा होते. घरीं कोण ऊठसूठ कौतुक करीत बसणार आहे. तर सांगायची गोष्ट म्हणजे, खायचे दांत आणि दाखवायचे दांत निरनिराळे असतात, गोपाळराव. आतां हेंच बघा. आमचं इतकं वय झालं पण अजूनहि मंडई आम्हींच करायची.

**वसंत** : मीं तुम्हांला कितीदां म्हटलं अण्णा, कीं मी मंडई आणीन म्हणून. पण तुम्ही मला करूनच देत नाहीं.

**अण्णासाहेब** : नाहीं म्हणजे काय नाहींच देणार. तूं रे कसली मंडई करणार? आमच्या मंडईतल्या बाया अशा चलाख असतात, गोपाळराव. अहो, याला पाहतां पाहतां फसवतील. म्हणे करूनच देत नाहीं. बरं निघा आतां. बाराच्या ठोक्याला जेवायला हजर असा म्हणजे झालं.

(वसंत कांहींच न बोलतां निघून जातो.)

**अण्णासाहेब** : बरं गोपाळराव, तुम्ही बसा जरा स्वस्थ. पुन्हा दुपारीं प्रवासाची दगदग आहेच. मी हा तासा-दीडतासांत येतोंच. रामा, अरे रामा—

(हें बोलत असतांनाच अण्णासाहेब कपडे करतात. रामाला हाका मारीत बाहेरच्या व्हरांड्यांत जातात. रामा परस्पर व्हरांड्यांत येतो. आणि ते दोघे बाहेर पडतात.

गोपाळराव मनगटावरच्या घड्याळांत बघतात. विचारमग्न स्थितींत फेऱ्या घालीत राहतात. एकदां व्हरांड्यांत जाऊन रस्त्यावर दृष्टिक्षेप टाकून येतात. ते पुन्हा फेऱ्या घालीत असतांनाच ऊर्मिला येते.)

**गोपाळराव** : (थबकून, आनंदांत) आलीस? म्हटलं, विसरतेस कीं काय.

**ऊर्मिला** : तुम्हीं इतकं बजावून सांगितल्यावर विसरेन कशी, काका?

**गोपाळराव** : (तिच्या पाठीवर हात फिरवून) ये बैस अशी. पुष्कळ वेळ घेऊन आली आहेस ना?

**ऊर्मिला** : हो ना. कांहीं विशेष कामाकरतां बोलावलं होतंत का काका मला ?

**गोपाळराव** : (हंसत) म्हटलं तर हो, म्हटलं तर नाहीं. अगदीं केळकरी पद्धतीचं उत्तर झालं नाहीं ग ? सहज आपलं गप्पा मारायला बोलावलं होतं तुला. हं मग काय, रिझल्ट केव्हां आहे ?

**ऊर्मिला** : पुढच्या आठवड्यांत आहे.

**गोपाळराव** : पास झाल्यावर काय करायचं टरवलं आहेस ?

**ऊर्मिला** : अगोदर पास तर होऊं दे मला—

**गोपाळराव** : त्याच्याबद्दल शंकाच नको. तूं पास तरी नक्की होणार.

**ऊर्मिला** : बघायचं मग काका. कुठं हाऊसमनशिप् मिळाली तर बरं होईल असं वाटतं.

**गोपाळराव** : काल जेव्हां एवढ्या निश्चयानं म्हणालीस कीं, मला फॉरिनला जायचं नाहीं, तेव्हां मला आश्चर्यच वाटलं. (ऊर्मिला दचकून त्यांच्याकडे पाहते.) तुम्हीं तरुण मुलींनीं कसं जितकं शिकतां येईल तितकं शिकून घेतलं पाहिजे. त्यांतून तुझ्यासारखी बुद्धिमान् महत्त्वाकांक्षी मुलगी असली—

**ऊर्मिला** : पुरे पुरे हं काका. तुम्हांला स्तुति फार चांगली करतां येते.

**गोपाळराव** : कां ? खोटं सांगतोंय कीं काय मी ? तूं जर हुशार नसतीस तर एवढा फर्स्ट क्लास बरा मिळवला असतास नेहमीं ? आणि माणूस महत्त्वाकांक्षी असल्याशिवाय का एवढ्या सगळ्या अडचणींना तोंड देऊन पुढं येतं ?

**ऊर्मिला** : पण काका—

**गोपाळराव** : कांहीं बनवूं नकोस तुझ्या काकाला. तूं सांगितलं नाहींस तरी दुसरं कुणी असतंच कीं सांगणारं. मधें सहा महिने तूं नोकरी केलीस, कॉलेज सांभाळून शिकवण्या केल्यास. मला सगळं माहीत आहे बरं—

**ऊर्मिला** : कुणीं सांगितलं तुम्हाला ? दुसरं कोण, सुनंदानं सांगितलं असेल. तिला तरी दुसरा उद्योग नाहीं.

**गोपाळराव** : सुनंदा मला सांगत होती, ऊर्मिला खुळी आहे. उगीच खस्ता काढीत असते. तिच्या अण्णांसारख्या एखाद्या माणसानं मदत नसती का केली ?

ऊर्मिला : मला आवडत नाहीं कुणापुढं हात पसरायला, काका. मी फ्रीशिपसुद्धां घेतली नाहीं कॉलेजांत. मला माझं शिक्षण दयेवर करायचं नव्हतं.

गोपाळराव : आणि आतांसुद्धां दुसऱ्यांची मदत घेतल्याशिवाय फॉरिनला जातां यायचं नाहीं म्हणून तो विचार बाजूला सारीत आहेस, असंच ना ?

ऊर्मिला : तसं नाहीं, काका—

गोपाळराव : पण तुला हें कसं कळत नाहीं, ऊर्मिला, कीं अशा हटवादानं तूं आपली कोंवळी उमेद झगडण्यांतच वाया घालवशील ?

ऊर्मिला : मला त्याचं फारसं वाईट वाटत नाहीं, काका—

गोपाळराव : कदाचित् आणखी वीस वर्षांनीं तूं असं म्हणणार नाहींस.

ऊर्मिला : आमच्या घरांतल्या लोकांचे पीळ लवकर सुटत नाहींत !

गोपाळराव : पण मला तुझ्या या हट्टाचा अर्थच कळत नाहीं. तुला पुढं शिकायची हौसच नाहीं कीं काय, असं वाटायला लागलंय मला.

ऊर्मिला : कसं सांगूं तुम्हांला, काका ? मला अतिशय आवड आहे शिकायची. अगदीं Passion of Life म्हणतात ना, तशी ओढ आहे माझ्या मनांत. पण ज्या मार्गानं आपल्याला जायचंच नाहीं, त्याबद्दल विचार तरी कशाला करा.

गोपाळराव : तूं कुणापुढं हात पसरायला जाऊं नकोस. पण कुणी आपण होऊन तुला मदत करायला तयार झालं तर ?

ऊर्मिला : म्हणजे ?

गोपाळराव : माझा मुलगा विनय जाणार आहे अमेरिकेला. तूं जातेस का त्याच्याबरोबर ?

ऊर्मिला : काका—

गोपाळराव : अगदीं जगावेगळी तऱ्हा आहे ही माझी. पण तरी सांगतों. माझ्या मुलासाठीं मागणी घालतोंय् मी तुला, ऊर्मिला—

(ऊर्मिला सुन्न झाल्यासारखी बसून राहते.)

गोपाळराव : तुझ्याकरतां विशेष कांहीं करीत नाहीं मी बेटा. यांत माझाच स्वार्थ आहे. मीं तुला काल म्हटलं ना, मला चक्रांतून बाहेर पडायचंय म्हणून !—

पैसा मिळवला. पैशांना विकत घेतां येणारीं सुखंहि मिळविलीं. पैशाबरोबरच मोठेपणाच्या, तोलाच्या भलभलत्या कल्पना मनांत रुजल्या. ऊर्मिला, या पैशाच्या खुंटाभोंवतीं अगदीं निर्जीव खेळण्यांप्रमाणें आम्ही फेऱ्या घालीत राहिलों आहोंत. तूं आमच्या घरांत ये. तुझं चैतन्य आण. आम्हांला माणसं कर. नानाच्या आणि माझ्या तुटलेल्या स्नेहाचा धागा परत जोडणार आहें मी.

ऊर्मिला : मला न विचारतां तुम्हीं सगळं ठरवलेलं दिसतंय—

गोपाळराव : (दुखावलेल्या स्वरांत) असं कसं म्हणतेस, पोरी ? तुझ्या नानाजवळ गोष्ट काढण्याच्या अगोदर मी तुझ्याजवळ बोललों. मी तुला घाई करीत नाहीं. तूं सावकाश विचार कर. विनय दोन वर्षांपूर्वी इंजिनिअर झाला. आतां त्याला पुढच्या शिक्षणाकरतां अमेरिकेला पाठवणार आहें मी. तूंहि त्याच्याबरोबर जा, खूप शिकून ये. तुझ्या बुद्धिमत्तेचं पुरेपूर चीज कर. माझा आहे म्हणून सांगत नाहीं. पण विनय खरोखरच फार चांगला मुलगा आहे. तूं नागपूरला ये, रहा. एकमेकांना एकमेकांचे स्वभाव पटतात कीं नाहीं पहा—

ऊर्मिला : (तुटकपणानें) मला लग्न करायचं नाहीं.

गोपाळराव : (थोडा वेळ स्तब्ध राहून) तूंहि या फॅशनच्या आहारीं गेली आहेस वाटतं.

ऊर्मिला : लग्न न करणं ही फॅशन आहे असं मी समजत नाहीं, काका.

गोपाळराव : (एकदम कांहीं विचार सुचून) आतां मला कळलं. छे, छे, तुम्ही मानी लोक फार संशयी असतां. हें बघ, अशी घुमी होऊन बसूं नकोस. लग्न करायचं नाहीं, असं तूं नक्की ठरवलं आहेस का ?

ऊर्मिला : जवळ जवळ—

गोपाळराव : बरं मग आतांपर्यंत मी जें कांहीं बोललों, तें आपण विसरून जाऊं या. आतां नीट लक्ष देऊन ऐक. माझा एकुलता एक मुलगा चांगला शिकून मार्गाला लागलाय्. मला दुसरे कसलेहि पाश नाहींत. माझ्या या पैशांचा उपयोग तूं माझ्यापेक्षां चांगला करशील. तुझ्या नानामधें आणि माझ्यामधें भेद करूं नकोस तूं, पोरी. तुला हवं तितकं शीक—तुला हॉस्पिटल

काढून देण्याचं मी वचन देतों. मी तुला कसलीहि अट घालीत नाहीं, कसल्याहि बंधनांत अडकवीत नाहीं. एवढं करशील का तुझ्या गोपाळकाका-साठीं ? उगीच एककल्लीपणा दाखवून ' नाहीं ' म्हणालीस, तर मला फार वाईट वाटेल.

ऊर्मिला : काका, तुम्ही इतके कां हो चांगले आहांत ? जगांत इतकीं निःस्वार्थी माणसं असतील असं मला कधींच वाटलं नव्हतं.

गोपाळराव : कोण म्हणतो, मी निःस्वार्थी आहें म्हणून ? माझं तर म्हणणं आहे, आत्तांच्या सारखा स्वार्थीपणा मीं कधींच दाखवला नसेल. बरं मग ठरलं ना ?

ऊर्मिला : काका—

गोपाळराव : आतां कुठं घोडं अडलं ?

ऊर्मिला : कसं सांगू तुम्हांला काका ?—मला तुमची देणगी स्वीकारतां यायची नाहीं.

(थोडा वेळ स्तब्धता.)

गोपाळराव : कां ?

ऊर्मिला : तेंहि मला सांगतां यायचं नाहीं. काका, रागावलांत का माझ्यावर ?

गोपाळराव : (रुद्ध स्वरांत) नाहीं पोरी. मला वाटलं, मी तुझ्यावर लग्नाची सक्ति करतोंय् असा तुझा गैरसमज झाला कीं काय ?

ऊर्मिला : तसं नाहीं काका—माझा तसला कांहीं गैरसमज मुळींसुद्धां झालेला नाहीं.

गोपाळराव : म्हणून तें बोलणं अजिबात बाजूला ठेवलं. फक्त तुझा मार्ग सुकर व्हावा, तुझ्या आणि तुझ्या बापाच्या आजवरच्या श्रमांचं चीज व्हावं या एकाच उद्देशानं काय अल्पस्वल्प हातून होईल तें करावं, असं वाटलं. पण तूं आपला मान विसरत नाहींस. मला परका समजतेस—

ऊर्मिला : नाहीं, नाहीं, मी तुम्हांला परके अगदीं समजत नाहीं. काका, मला कल्पना आहे कीं मी माझ्या आयुष्यांतील एकुलती एक संधि दवडतेंय्. पण माझा नाइलाज आहे.

**गोपाळराव** : कां नाइलाज आहे ?

**ऊर्मिला** : मी वचनांत गुतलेंय, काका—

**गोपाळराव** : ऊर्मिला—

**ऊर्मिला** : हो, पण मला जास्त कांहीं विचारूं नका.

**गोपाळराव** : तें वचन थोडं सैल नाहीं का करतां यायचं ?

**ऊर्मिला** : माझा शब्द मोडायला मला आवडणार नाहीं.

**गोपाळराव** : कसलं वचन, कुणाला दिलं होतंस, याबद्दल कांहीं विचारूं का ?

**ऊर्मिला** : नको, मला जास्त कांहीं सांगतां यायचं नाहीं.

(थोडा वेळ स्तब्धता.)

**गोपाळराव** : (एक सुस्कारा सोडून) ठीक आहे.

(उठून कपडे चढवूं लागतात.)

**ऊर्मिला** : (त्यांच्याजवळ जाऊन) काका, मी फार अपमानकारक बोललें का ?

**गोपाळराव** : वेडी कुठली ! मला कळत का नाहीं ? तुझ्यासारखी तेजस्वी मुलगी लाभली याकरतां नानाचा हेवा वाटतो मला.

**ऊर्मिला** : मी कृतघ्न आहें असं समजूं नका, काका.

**गोपाळराव** : छे, छे. असं कसं समजेन मी कांहींतरी ? तूं अगदीं मनाला लावून घेऊं नकोस. बरं, आतां निघायला पाहिजे मला. जिमखान्यावर जायचंय. आज तीनच्या गाडीनं निघणार मी.

(ऊर्मिला पटकन पुढें होऊन त्यांना वांकून नमस्कार करते.)

**ऊर्मिला** : नमस्कार करतें मी, काका.

**गोपाळराव** : (तिच्या डोक्यावर हात फिरवून दाटलेल्या आवाजानें) यशस्वी हो बेटा.

(गोपाळराव बाहेर जातात. ऊर्मिला थोडा वेळ त्यांच्या पाठमोऱ्या मूर्तीकडे पहात उभी असते. नंतर ती वर सुनंदाकडे जायला निघते, पण बेत फिरवून ती तशीच बाहेर पडूं लागते. खालच्या मानेनें चालत असल्यामुळें तिला समोरून येणारा दिवाकर दिसत नाहीं.)

**दिवाकर** : (हंसत) तुमची घाई फुकट गेली बरं का. शेवटीं दारांतच गांठलं मीं तुम्हांला—

(त्याला पाहिल्यावर ऊर्मिला दचकते. पण नंतर स्वतःला सावरते.)

**ऊर्मिला :** म्हणजे काय? तुम्ही येण्याच्या अगोदर जावं असा कांहीं उद्देश नव्हता माझा.

**दिवाकर :** आपला याच्यावर विश्वास नाहीं बुवा. जसं सुनंदानं तुम्हांला सांगिलंच नसेल मी येणार आहें म्हणून.

**ऊर्मिला :** मी सुनंदाला भेटलेंच नाहीं.

**दिवाकर :** मग?

**ऊर्मिला :** गोपाळकाकांनीं बोलावलं होतं.

(मघांच्या प्रसंगाच्या आठवणीनं तिचं तोंड गोरंमोरं होतं. दिवाकर थोडा वेळ तिच्याकडे निरखून पाहतो.)

**दिवाकर :** तुम्हांला काय झालंय?

**ऊर्मिला :** (हंसण्याचा प्रयत्न करीत) कांहीं नाहीं—

(ऊर्मिलेचे डोळे पाण्यानें भरून येतात. हंसत हंसतच ती हातरुमालानें डोळे टिपते.)

**दिवाकर :** तुम्ही जरा बसतां कां! मला सांगा पाहूं तुम्हांला काय झालंय् तें. मी कांहीं करूं शकतों का?

**ऊर्मिला :** कोणीं कांहीं करण्यासारखं राहिलेलं नाहीं. मीं सगळं करूनच टाकलंय. मी कोड्याच्या भाषेंत बोलतें का फार? जाऊं दे. आतां मी अगदीं ठीक आहे. जायला हवं मला. Thanks a lot.

(ऊर्मिला उठून उभी राहते. पण दिवाकर तसाच उभा राहतो.)

**दिवाकर :** कशाला बोलावलं होतं तुम्हांला गोपाळरावांनीं?

**ऊर्मिला :** सहज—

**दिवाकर :** कशाला खोटं सांगतां उगीच? तुम्ही बोललांत तर तुम्हांला जरा मोकळं वाटेल—

**ऊर्मिला :** नाहीं मला मोकळं वाटायचं.

**दिवाकर :** काय बोलत होते गोपाळराव?

**ऊर्मिला :** तुम्हीं विचारलंच पाहिजे का?

**दिवाकर** : (खांदे उडवून) नको म्हणत असाल तर नाहीं विचारीत.

**ऊर्मिला** : ते मला अमेरिकेला पाठवायला तयार होते.

**दिवाकर** : अस्सं—

**ऊर्मिला** : प्रथम त्यांनीं मला त्यांच्या मुलासाठीं लग्नाचं विचारलं. तो अमेरिकेला जाणार आहे, थोड्याच दिवसांत. त्याच्याबरोबर मींहि जावं असं त्यांचं म्हणणं होतं—

**दिवाकर** : तुम्हीं काय सांगितलं मग त्यांना ?

**ऊर्मिला** : मी त्यांना सांगितलं कीं, मी लग्न करणार नाहीं.

(थोडा वेळ स्तब्धता.)

**दिवाकर** : त्यांना फार वाईट वाटलं का ?

**ऊर्मिला** : वाईट तर वाटलं. पण तेवढ्यावरच संपलं नाहीं दिवाकर. गोपाळकाकांना माझ्याबद्दल इतकी आपुलकी आहे ! मीं लग्नाला नकार दिल्यावर त्यांनीं तो विषय अगदीं बाजूला ठेवला. मला म्हणाले, तुला हवं तितकं शीक. तुझ्या खर्चाची, एवढंच नव्हे तर हॉस्पिटल काढून देण्याची सुद्धां हमी मी घेतों—

**दिवाकर** : तुम्हीं रुकार दिला का याला ?

**ऊर्मिला** : नाहीं !

**दिवाकर** : कां ? तुम्हाला पुढं शिकण्याची इच्छा नाहीं ?

**ऊर्मिला** : (भावनेच्या आहारीं जाऊन) फार—फार आहे. आतां होती म्हणायला पाहिजे. जेव्हां तें माझ्या आवाक्यांतच नव्हतं, तेव्हां मला इतकं वाटत नव्हतं. पण आतां—

**दिवाकर** : तुम्हीं इतक्या घाईनं नकार कशाला दिलात ? फिरून विचार करून पहा. इतक्या मोठ्या मनानं देऊं केलेल्या मदतीचा तुम्हीं अव्हेर करावा असं मला वाटत नाहीं. अशा संधी कांहीं पुन्हा पुन्हा येत नसतात आयुष्यांत. तुम्ही फॉरिनला जाऊन खूप शिकून आलांत, मोठं हॉस्पिटल काढलंत, तर सगळ्यांना किती आनंद होईल. कां नाहीं जात तुम्ही ?

ऊर्मिला : तें शक्य नाहीं.

दिवाकर : कां ? गोपाळकाकांचे उपकार घेणं नको वाटतं का ?

ऊर्मिला : तसं कांहीं मीं वाटून घेतलं तर त्यांच्या भावनेचा अपमान केल्या-सारखं होईल.

दिवाकर : मग कां जात नाहीं तुम्ही ? सांगा ना—

ऊर्मिला : कारण—कारण मीं वचनांत गुंतलें आहें.

दिवाकर : (थोडा वेळ स्तब्ध राहून) कसलं वचन ?

ऊर्मिला : माफ करा दिवाकर—मी जास्त कांहीं बोलूं इच्छीत नाहीं त्या बाबतींत.

दिवाकर : असं अर्धवट सांगून सोडून द्यायला देणार नाहीं मी तुम्हांला. कुणाला दिलं होतं तुम्हीं वचन ?

ऊर्मिला : मीं अशी सहानुभूतीची अपेक्षा करावी, हा माझा दुबळेपणा आहे.

दिवाकर : कुणाला वचन दिलं होतं तुम्हीं ?

ऊर्मिला : मला सगळं सांगायला लावूनच तुमचं समाधान होणार असेल, तर ऐका–मीं वसंताला वचन दिलं होतं.

दिवाकर : वसंताला ?

ऊर्मिला : तीन वर्षांपूर्वीं मरणाच्या दारांत उभी असतांना मीं त्याला वचन दिलं. दिवाकर, तें वचन मोडणं माझ्याच्यानं कधींहि होणार नाहीं.

दिवाकर : कसलं वचन ?

ऊर्मिला : फार मोठी कथा आहे ती. वसंताची आणि माझी कॉलेजमधें मामुली ओळख होती. तुम्हांला माहीत असेल, तो नानांकडे शिकायला यायला लागला, त्याला पांच वर्षं झालीं. तेव्हां माझी आई होती. तिला साऱ्या जगाचं प्रेम. आपली ओढघस्त होत असली, तरी दुसऱ्याचं करायला धावेल. घरीं-दारीं सगळ्यांनीं हिडीसफिडीस केल्यानं वसंत अगदीं कावल्यासारखा झाला होता.—त्याला आमच्या घरची विलक्षण माया लागली—

दिवाकर : (रुक्षस्वरांत) कदाचित् तुमची जास्त—

**ऊर्मिला** : मला तें त्यावेळीं मुळींच कळलं नाहीं. कळलं तें अशा विलक्षण क्षणाला—

(थोडा वेळ स्तब्धता.)

**दिवाकर** : बोला ना—

**ऊर्मिला** : मी मेडिकल कॉलेजच्या दुसऱ्या वर्षात होतें—त्या वर्षाच्या शेवटा-शेवटाला आईला टायफॉइड झाला. चार-पांच दिवसांनीं मींहि अंथरुण धरलं. नाना आजारीपणाच्या बाबतींत फार हळवे आहेत. त्यांनीं हातपायच गाळले. सगळ्या बाजूंनीं हलाखी होती. (थोडा वेळ थांबून) त्या वेळीं वसंत नसता तर आम्हीं काय केलं असतं कोण जाणे—

**दिवाकर** : अस्सं—!

**ऊर्मिला** : नवव्या दिवशीं आई गेली. मला कळवण्याचा प्रश्नच नव्हता. माझ्या एक दूरच्या मावशी घरांत होत्या. पण माझी खरी शुश्रूषा वसंतानंच केली. तो मला डोळ्यात तेल घालून जपत होता. त्यानं अलोचन जागरणं केलीं. अति-अतिश्रम केले. एकविसाव्या दिवशीं माझं जास्त झालं. डॉक्टरांनीं सांगितलं होतं, एवढी रात्र उलटली तर कांहीं धोका नाहीं. वसंताच्या प्रयत्नांना यश मिळायचं होतं. रात्रीं केव्हां तरी ताप उतरायला लागल्यावर मीं डोळे उघडले. वसंत माझ्याकडे एकटक पहात राहिला होता. त्याच्या डोळ्यातून घळघळ अश्रू वहात होते. मीं डोळे उघडलेले पाहून तो एकदम केविलवाण्या स्वरांत म्हणाला, ‘ऊर्मिला, मला सोडून जायचं नाहींस ग तूं. मला तुझ्याशिवाय राहतां यायचं नाहीं.’ त्याच्या हातून चमच्यानं पाणी पितां पितांच मीं डोळे मिटले. मला झोंप लागली. त्याच्या त्या तीव्र भावनेनं मला वेढून टाकलं, गुरफटून टाकलं. त्या अर्धवट शुद्धीच्या अवस्थेंत मला असं कांहींतरी भासलं कीं, त्याच्या माझ्यामध्यें कसलं तरी बंधन निर्माण झालं आहे. त्याला सोडून मला जातां यायचं नाहीं.

**दिवाकर** : (हंसत) आणि त्या अर्धवट शुद्धीच्या अवस्थेंत तुम्हीं त्याला वचन दिलंत असंच ना ?

**ऊर्मिला** : तुम्ही ही गोष्ट अशी हंसण्यावारी घालवलेली आवडणार नाहीं

मला दिवाकर! त्या मुलानं पुन्हा माझ्याजवळ एका शब्दानं गोष्ट काढली नाहीं. पण मींच एक दिवस त्याला छेडलं. आणि मग त्याला बोलल्याशिवाय राहवलं नाहीं.

दिवाकर : त्याचं तुमच्यावर विलक्षण प्रेम होतं?

ऊर्मिला : होतं आणि आहे. त्याच्या भावनेनं माझं मन इतकं व्याकळून गेलं कीं, मीं त्याला आपण होऊनच वचन दिलं.

दिवाकर : काय वचन दिलंत?

ऊर्मिला : मीं त्याला सांगितलं कीं, मीं जर कधींकाळीं लग्न केलं तर तें त्याच्याशींच करीन आणि दुसरं म्हणजे, मी त्याला सोडून एकटी कधींहि कुठं जाणार नाहीं.

दिवाकर : असं आपण होऊन कां वचन दिलंत तुम्हीं? त्यानं विरोध नाहीं केला?

ऊर्मिला : त्यानं फार विरोध केला. त्याच्या उत्कट भावनेला मी प्रत्युत्तर देऊं शकत नाहीं हें त्याला माहीत होतं.

दिवाकर : आणि तें तुम्हांलाहि माहीत होतं. तरीहि—

ऊर्मिला : तेंच तुम्हांला सांगण्याचा मी प्रयत्न करत्येंय्. तुम्हांला हें कळतं का, कीं माझ्याजवळ जगण्यासारख्या इतर पुष्कळ गोष्टी आहेत, पण वसंताला फक्त मीच आहें?

दिवाकर : पण यांत तुम्ही त्याची एक प्रकारानं फसवणूक नाहीं का करीत?

ऊर्मिला : कृतज्ञतेपेक्षां फसवणूक बरी नाहीं का? त्यानं माझ्याकरतां इतकं कांहीं केलं आहे कीं, मी जन्मभर त्याची उतराई राहिलें पाहिजे. दिवाकर, त्याला जें हवंय् तें देऊं शकत नाहीं; म्हणून मला जें अतिशय हवं होतं, तें मीं देऊं केलं. लहानपणापासूनची माझी महत्त्वाकांक्षा होती कीं, फॉरेनला जायचं.

दिवाकर : आणि तुम्ही हें वचन आजन्म पाळणार आहांत?

ऊर्मिला : मी लग्न करणार नाहीं; तें मला फारसं अवघड जाणार नाहीं.

दिवाकर : पण तुमची शिकण्याची लालसा दडपून टाकणं फार कष्टाचं वाटतंय का?

ऊर्मिला : या क्षणाला वाटतंय्. पण मी मोहाला बळी पडलें नाहीं, याच समाधानहि वाटतंय्. (हंसून) कशी बोलत्येंय् मी! जसं कांहीं तरी फार मोठं केलं—

दिवाकर : कुणाकुणाला वाटेलहि तुम्हीं फार मोठं केलं आहे असं—

ऊर्मिला : (चमकून) म्हणजे?

दिवाकर : मला स्वतःला तसं वाटत नाहीं.

ऊर्मिला : तुम्हांला तसं कांहीं वाटावं अशी माझी अपेक्षाहि नाहीं. तुम्हीं कौतुक करावं म्हणून कांहीं मीं हें सारं तुम्हांला सांगितलेलं नाहीं.

दिवाकर : असा गैरसमज करून घेऊं नका. मी बोलूं का कांहीं?

ऊर्मिला : हं—

दिवाकर : मला असं कित्येकदां वाटतं कीं, माणूस मनाशीं कांहीं एक मूल्यं ठरवतो. तो त्यांच्या इतका आधीन होतो कीं, नंतर एका ठराविक पाटांतूनच त्याला आयुष्याचा ओघ सोडावा लागतो. 'ध्येयवाद्याची चाकोरी' म्हणा हवं तर याला—

ऊर्मिला : पण दिवाकर, माझी श्रद्धा आहे कीं, आयुष्याला बांध हवा, कक्षा हवी.

दिवाकर : आणि माझा विश्वास आहे कीं, आयुष्याला लवचिकपणा हवा, गतिमानता हवी—

ऊर्मिला : एकदां मनानं ठरवलेला निश्चय कडकपणानं पाळणं यांत दुबळेपणा आहे असं मला वाटत नाहीं.

दिवाकर : एकदां अमूल्य म्हणून ज्याची पूजा बांधली, तें मातीमोल म्हणून फेकून देणं सोपं नाहीं, ऊर्मिलाताई. माणसाला आपल्या श्रद्धेचा भंग झालेला पाहवत नाहीं. म्हणूनच क्षितिज वाढलं तरी झांपड काढायची त्याची तयारी नसते.

ऊर्मिला : पण मी तशी डोळेझांक केलेली नाहीं.

दिवाकर : (आपल्याच तंद्रींत) असं म्हणतात कीं, आयुष्य घडवायला फार धैर्य लागतं; पण तें वाऱ्यावर उधळून द्यायला त्याच्यापेक्षांहि अधिक धैर्य लागतं. नियम पाळणं जितकं कठीण आहे, त्याच्यापेक्षांहि नियम मोडणं

अधिक कठीण आहे. मीहि आदर्शांच्या कल्पनेला स्वतःचा बळी देतोंय् पण— निर्णय घेणं होत नाहीं.

ऊर्मिला : (भारावल्याप्रमाणें) दिवाकर, असं कां वाटतं तुम्हांला?

दिवाकर : (कडवटपणानें हंसून) वाटण्याच्या पलीकडे गेलंय् तें. (तीव्रतेनें) सहनशक्तीचा प्रश्नच नाहीं. ती केव्हांच संपली. जो राहिला होता, तो माझा आग्रह–पण मला त्याचाहि चोळामोळा करून टाकायचा आहे.

ऊर्मिला : तुम्ही अलीकडे फार अस्वस्थ आहांत. माझ्या लक्षांत आलं होतं तें.

दिवाकर : अस्वस्थ? फार साधा शब्द आहे हा. माझ्या मनांतला कडवटपणा त्या शब्दानं व्यक्त व्हायचा नाहीं. आणि आठ दिवसांपूर्वी मी तुमच्याशीं थोडंसं कांहीं बोलण्याचा प्रयत्न केला होता. तेव्हांपासून तुम्ही मला टाळतांहांत.

ऊर्मिला : कुणीं सांगितलं तुम्हांला?

दिवाकर : कुणीं सांगायला कशाला पाहिजे? मला कळत का नाहीं? कां टाळतां आहांत तुम्ही मला?

ऊर्मिला : तुम्हीं माझी उलटतपासणी कां चालवली आहे मघांपासून?

दिवाकर : हें माझ्या प्रश्नाचं उत्तर नव्हे.

ऊर्मिला : तें मलाहि कळतंय्. मी कशाला तुम्हांला टाळूं?

दिवाकर : तुम्हाला उत्तर माहीत नसेल, किंवा द्यायचं नसेल, तर मीच सांगतों. तुम्हांला भीति वाटते.

ऊर्मिला : (जवळजवळ तुच्छतेनं) भीति?

दिवाकर : हो, तुम्हांला माझी भीति वाटते. त्यापेक्षांहि स्वतःची भीति वाटते.

ऊर्मिला : (अस्फुटपणें) नाहीं—नाहीं—

दिवाकर : (एकदम तिच्या दोन्ही खांद्यांना धरून) तुला भीति वाटते. कारण— कारण तुझं माझ्यावर प्रेम आहे.

(ऊर्मिला मानेनं नाहीं म्हणते.)

दिवाकर : माझ्याकडे बघ, आणि पुन्हा एकदां सांग नाहीं म्हणून—

(ऊर्मिला डोळे मिटते. तिच्यामधली शक्ति एकदम नाहींशी झाली आहे. तिचे पाय थरथरतात. दिवाकर तिला सावरून धरतो. ती त्याच्यापासून दूर होण्याचा प्रयत्न करते, आणि त्याच क्षणीं—

सिनेमाला जाण्यासाठीं तयार झालेली सुनंदा नाचत बागडत जिना उतरूं लागते. अर्ध्या जिन्यावर आल्यावर तिला हॉलमधलें दृश्य दिसतें. ती हतबुद्ध होऊन थबकते. तिच्या तोंडून 'दिवाकर' अशी किंकाळी फुटते. दिवाकर आणि ऊर्मिला चमकून बाजूला होतात. सुनंदा धावत खालीं येते. आणि—

रागाच्या भरांत ती ऊर्मिलेच्या गालावर प्रहार करते. दिवाकर तिला आवरूं पाहतो. त्याबरोबर ओक्साबोक्शीं रडत ती कोचावर कोसळते. दिवाकर आणि ऊर्मिला सुन्नपणें एकमेकांकडे पाहात उभीं राहतात. आणि लगेच अण्णासाहेबांची हाक बाहेरून ऐकूं येते.)

**अण्णासाहेब** : नंदुताई—अग नंदुताई, शेवटीं काय मंडई आणायची तें विसरलोंच बरं का. काय दिसलं ते घेऊन आलों शेवटीं. (रामा व्हरांड्यांतून परस्पर आंत जातो. अण्णासाहेब बोलत बोलत आंत येतात. सुनंदाला रडतांना पाहून ते थबकतात. सुनंदाचे हुंदके जास्तच वाढतात.)

**अण्णासाहेब** : अं? काय, झालं काय? नंदुताई, अग नंदा, काय झालं तुला रडायला? अजून तें रेकॉर्ड्सचं का घेऊन बसली आहेस तूं?—काय रे दिवाकर, अरे झालंय् काय तुझ्या सुनंदाला?

**सुनंदा** : (एकदम् डोकं वर करून ऊर्मिलेला) असा कां माझा विश्वासघात केलास तूं? तुला मी माझी जिवाची मैत्रीण समजत होतें—

**दिवाकर** : सुनंदा, तिचा कांहीं दोष नाहीं—

**सुनंदा** : तुम्ही एक अक्षरसुद्धां बोलूं नका. मी तुमच्यावर जिवापलीकडे प्रेम केलं—आणि तुम्ही माझी अशी फसवणूक केली—

**अण्णासाहेब** : अरे, पण प्रकार आहे काय हा? काय रे दिवाकर—

**सुनंदा** : (अण्णांच्या जवळ जाऊन) अण्णा—

**अण्णासाहेब** : उगी उगी ताई. मला सांगशील तर खरं काय झालं तें?

**सुनंदा** : काय व्हायचं राहिलंय् अण्णा, आतां? हे असं कांहीं करतील—आणि

ऊर्मिला—मी आत्तां आत्तां या दोघांना—(पुढचे शब्द हुंदक्यामधें विरून जातात.)

**अण्णासाहेब** : (दरडावणीच्या स्वरांत) दिवाकर, ही सांगते तें खरं आहे का !

**दिवाकर** : (शांतपणानें) हो, अण्णासाहेब.

**अण्णासाहेब** : (रागानें लटलट कांपत) शरम नाहीं वाटत ? धडधडीत तोंडावर अपमान करतोस माझा ?

**दिवाकर** : आजवर तुम्हीं माझा जो मानभंग केला आहे त्याच्या पासंगालाहि पुरणार नाहीं हा.

**अण्णासाहेब** : कुणाशीं बोलतो आहेस याची शुद्ध आहे का ?

**दिवाकर** : माझ्या उपकारकर्त्याशीं बोलत आहें, तें मला माहीत आहे.

**अण्णासाहेब** : त्याची तरी जाणीव ठेवा थोडी. आज दारोदार भीक मागत हिंडला असतास—

**दिवाकर** : त्याचंच मला वाईट वाटतं. कां नाहीं भीक मागत हिंडलों ? तुमच्या अन्नावर पिंड पोसण्यापेक्षां उपाशी कां नाहीं राहिलों? या लाचारीपेक्षां ती लाचारी पुरवली असती.

**अण्णासाहेब** : कसला रे माज चढलाय् तुला ? कुठचा कोण तूं—ना नात्याचा ना गोत्याचा. तुझं शिक्षण केलं, तुला वाढवला. एवढंच नव्हे तर तुझा संसार थाटून द्यायचा बेत केला—

**दिवाकर** : बस, बस ! तुम्हीं माझ्यावर जे जे उपकार केलेत त्यांची जंत्री मला पाठ आहे. मला पुन्हा ऐकवूं नका. कुणी नवखे गृहस्थ भेटले, विशेषतः मी असतांना भेटले, तर त्यांना सांगण्याकरतां राखून ठेवा—

**अण्णासाहेब** : मी नव्हतों आलों पदर पसरून तुझ्याकडे, कीं बाबा रे, ही घे मदत तुला. आजकालच्या जगांत कोण कुणासाठीं करतोय्—

**दिवाकर** : तुम्हींहि करायला नको होतं.

**अण्णासाहेब** : तुझ्यासारखे उलटया काळजाचे लोक भेटले कीं वाटतं, खरंच करायला नको होतं. फुकट, फुकट साप पोसला मीं.

**दिवाकर** : कशाला फुकट पोसाल अण्णासाहेब ? तेवढी जर दानत तुमच्याजवळ

असती तर आपल्या मोठेपणाची अशी जाहिरात केली नसती तुम्हीं. विद्यादानाच्या गोंडस नांवाखालीं तुम्हीं मला विकत घेतलंत.

**अण्णासाहेब** : विकत घेतलं ?

**दिवाकर** : एकदां नाहीं, त्रिवार म्हणेन मी. तुम्हीं मला विकत घेतलं. मला शिक्षण द्यायचं कबूल केलंत, त्याच वेळीं आपल्या मुलीशीं लग्न करायचं माझ्याकडून कबूल करवून घेतलंत. माझ्यावरच्या उपकारांचा पाढा वाचतां तेव्हां हेंहि कां नाहीं सांगत सगळ्यांना ?

**अण्णासाहेब** : आणि काय झालं रे त्यांत ? तुझ्या कॉलेजचा सारा खर्च केला, त्याच्या बदलीं—

**दिवाकर** : तेंच, तेंच, अण्णासाहेब. माझं शिक्षण करण्यांत परार्थाचा हेतु नव्हता तुमचा. घरबसल्या, खटपट न करतां, हुंड्यावाचून जांवई मिळणार होता; आणि त्याशिवाय केवढा तरी भलेपणा पदरांत पडत होता. तुमच्या श्रीमंतीचा पोकळपणाहि अनायासें झांकला जाणार होता. सुदैवानं किंवा दुर्दैवानं, मी पहिल्यासारखा भोळा राहिलेला नाहीं.

**अण्णासाहेब** : ही पश्चात् बुद्धि कशाला आठवतेय् रे तुला ? एवढा जर तुला अपमान वाटत होता, तर तेव्हांच कां नाहीं सांगितलंस धडधडीत 'नाहीं' म्हणून ?

**दिवाकर** : नाहीं सांगितलं. सांगूं शकलों नाहीं. शिकायची तळमळ होती. विद्यार्जनाची लालसा होती. दुसरे सगळेच मार्ग बंद होते. म्हणून हा स्वीकारला. पण त्याकरतां केवढी किंमत दिली मीं ! स्वतःला गुलाम केलं. मनाला जोखड घातलं. एखाद्या कळसूत्री बाहुल्यासारखा तुमच्या इच्छेच्या दोरीवर नाचत राहिलों. लाचार झालों. दुबळा झालों. अण्णासाहेब, स्वतःला मीं मारून टाकलं. परगांवीं आलेली मानाची नोकरी केवळ तुमची अनुमति नाहीं म्हणून मला लाथाडावी लागली. तुम्हांला आवडत नाहीं म्हणून कितीतरी आवडीनिवडींवर पाणी सोडावं लागलं. मी दिवाकर राहिलोंच नाहीं. केवळ तुम्हीं मदत केलेला मुलगा, तुमचा भावी जांवई, एवढ्याच भूमिका जगत राहिलों.

**अण्णासाहेब** : वा, वा ! फार मोठं केलंस ! एवढा त्रासला होतास, तर राहायचं

होतंस स्वतःच्या पायावर उभं. कशाला राहिलास माझ्या पैशावर जगत ?

दिवाकर : कशाला ? कशाला !—तें तुम्हांला कळायचं नाहीं. हजारदां तुमचा आश्रय झुगारून देण्याचा विचार आला. पण मी तसं करूं शकलों नाहीं. मनावरचे संस्कार विसरूं शकलों नाहीं. मीं तुम्हांला शब्द दिला होता.

अण्णासाहेब : आणि आतां कुठं गेला तुझा शब्द ?

दिवाकर : दिला—आज वाऱ्यावर उधळून दिला. माझ्या आग्रहापेक्षांहि जळजळीत असं कांहीं मनांत निर्माण झालं आहे. त्याच्याकरतां आजवरचं सारं आयुष्य ओवाळून टाकण्याची माझी तयारी आहे. अण्णासाहेब, तुम्हीं आजवर माझ्याकरतां जो खर्च केलात, तें सर्व मी कर्ज समजतों. तुमची पैन् पै अगदीं सव्याज फेडल्याशिवाय मी राहणार नाहीं. मी स्वतःला बंधमुक्त करून घेतलं आहे.

सुनंदा : } दिवाकर—
अण्णासाहेब : } काय—काय बोलतो आहेस काय तूं ?

दिवाकर : अगदीं खरं तेंच बोलतोंय्. माझं ऊर्मिलेवर प्रेम आहे. आणि तिचंहि माझ्यावर—आतां मला कोणीहि अडवूं शकणार नाहीं. तिच्याशीं लग्न करण्याची माझी इच्छा आहे—

(ऊर्मिला या वेळेपर्यंत पुतळ्याप्रमाणें दिवाकराकडे पाहात उभी असते. स्वप्नांतून जागी झाल्याप्रमाणें ती ओरडते.)

ऊर्मिला : नाहीं, नाहीं ! तें शक्य नाहीं.

दिवाकर : ऊर्मिला—

ऊर्मिला : मी तुमच्याशीं लग्न करणार नाहीं. मला लग्न करायचं नाहीं—

(ऊर्मिला तडक दारांतून बाहेर पडते. दिवाकर झपाट्यानें तिच्या पाठोपाठ जाऊं लागतो.)

सुनंदा : (दिवाकराला अडवीत) दिवाकर—

(दिवाकर सुनंदाला बाजूला ढकलतो. ती खालीं पडते. दिवाकर आवेशानें दारापर्यंत जातो. आणि एकदम् बांधल्यासारखा उभा राहतो. श्रांत झाल्याप्रमाणें तो दाराला टेकतो.)

**पडदा**

# ३

[पहिल्या अंकांतली नानांच्या घराची दर्शनी खोली. रविवारची संध्याकाळ. दिवेलागण होऊन गेली आहे. मास्तर तंबोरा लावीत स्वत:शींच कांहीं गुणगुणत बसले आहेत. ऊर्मिला त्यांच्याकडे पाठ करून ऑर्गनजवळ एक पुस्तक वाचीत बसली आहे. थोडा वेळ गेल्यानंतर ती एकदम पुस्तक मिटते आणि नुसतीच समोर बघत राहते.]

**नाना** : आतां कांहीं वसंत येईल असं दिसत नाहीं. काल ध्यायला झालं नाहीं म्हणून अगदीं बजावून सांगितलं होतं 'आज ये' म्हणून. काय ग अक्का, सकाळीं गेली होतीस ना तूं त्यांच्या घरीं ? कांहीं बोलला का तेव्हां ?

**ऊर्मिला** : (न वळतांच) मला भेटलाच नाहीं तो—

**नाना** : हं! मला कांहीं त्या पोराचं लक्षण ठीक दिसत नाहीं. अग, कशांतच त्याचं चित्त स्थिर नाहीं. अशानं कसं व्हायचं ? माणसानं कशाला तरी चिकटून राहिलं पाहिजे. त्याला कांहीं अगदींच डोकं नाहीं असं नाहीं. पण पण तें सगळं वाया घालवलं पोरानं. आतां मला सांग, हा काय करणार आहे आयुष्यांत ? त्यांतून घरींदारीं सगळ्यांनीं एकसारखं त्याला फैलावर घ्यायचं. गांजून गेलाय् अगदीं—

**ऊर्मिला** : (वळून तीव्र स्वरांत) नाना—

**नाना** : (चमकून) काय अक्का ?

**ऊर्मिला** : (खालच्या मानेनं) कांहीं नाहीं—

**ऊर्मिला** : (एकदम आवेगांत, रुद्ध कंठानें) मला आज सकाळपासून आईची फार आठवण येत्येय्—

**नाना** : (लगबगीनें तिच्याजवळ येऊन) काय झालं ग ? आज सकाळीं अन्नावर-सुद्धां वासना नव्हती तुझी. जिवाला बरं नाहीं का वाटत ? काय झालं, मला सांगणार नाहींस का ?

**ऊर्मिला** : असं वाटतंय्, आईच्या कुशींत शिरावं आणि रडूं येतं का पाहावं—

**नाना** : बापाची माया अपुरी वाटते का पोरी ? तूं असं बोलायला लागलीस, म्हणजे माझ्या जिवांत कालवतं बघ. माझा सारा जीव तुझ्यावर आहे, अक्का. मला कोण आहे दुसरं ?

**ऊर्मिला** : कसं सांगूं हो नाना तुम्हांला ?

**नाना** : अगदीं काय मनांत असेल तें सांग मोकळेपणानं—(ऊर्मिला नुसतीच हंसते.)

**नाना** : (थोडा वेळ थांबून) सांग बरं—मुळींसुद्धां अनमान करूं नकोस.

**ऊर्मिला** : (शांत स्वरांत) सांगतें नाना. मीं लग्न करायचं ठरवलं आहे.

**नाना** : (ताण सुटल्याप्रमाणें) एवढंच ना ? मला वाटलं, काय सांगणार आहेस कोण जाणे. म्हणून आईची मध्यस्थी पाहिजे होती वाटतं ! तुला काय वाटलं, मी रागावेन ?

**ऊर्मिला** : मला वाटलं, कदाचित् तुम्हांला आवडणार नाहीं.

**नाना** : वा ग पोरी ! मला इतका स्वार्थी समजतेस होय तूं !

**ऊर्मिला** : (चमकून) तसं नाहीं, नाना. तसं बिलकूल नाहीं. (स्वतःशीं बोलल्या-प्रमाणें) फार चांगलीं आणि फार समजून घेणारीं माणसं भोंवतीं असणं हेंहि नकोसं होतं कधींकधीं.

**नाना** : शहाणीच आहेस मोठी ! आणि चांगलं हंसत, आनंदानं सांगायचं, तर असं डोळ्यांत पाणी आणायला ग काय झालं ? कोण आहे कोण हा भाग्यवान् ? आम्हांला कळूं दे तरी. कॉलेजांतलाच आहे वाटतं कोणी ?—अं ?

**ऊर्मिला** : (भावनारहित स्वरांत) मीं—मीं वसंताशीं लग्न करायचं ठरवलं आहे—(नाना धक्का बसल्याप्रमाणें स्तब्ध राहतात.)

**ऊर्मिला** : तुम्ही बोलत कां नाहीं कांहीं ?

**नाना** : काय बोलावं तेंच कळत नाहीं.

(नाना तिच्याकडे पाठ वळवून खोलीच्या दुसऱ्या बाजूकडे चालत जातात. ऊर्मिला त्यांच्या मागोमाग येतां येतां बोलते.)

ऊर्मिला : त्यानं मला बऱ्याच दिवसांपूर्वी विचारलं होतं. त्यावेळीं मीं त्याला कांहींच सांगितलं नाही. पण आज—आज मला कळून चुकलं कीं, त्याच्याशीं लग्न केल्याशिवाय मला जगतां येणं शक्य नाहीं.

नाना : (एकदम वळून) अक्का—

ऊर्मिला : काय नाना ?

नाना : ही तूं बोलत नाहींस. तूं माझ्यापासून कांहीं तरी लपवून ठेवीत आहेस.

ऊर्मिला : नाहीं, नाना. मी तुमच्यापासून कांहींहि लपवून ठेवीत नाहीं. मी बोललें तें अक्षरशः खरं आहे.

नाना : (कठोरपणें) तुला गरिबीचा कंटाळा आला कीं काय ?

ऊर्मिला : (दुखावलेल्या स्वरांत) हो !

नाना : अशी रागावूं नकोस, अक्का. माझं मन इतकं गोंधळून गेलं आहे—

ऊर्मिला : मला कल्पना आहे, नाना—

नाना : अण्णासाहेबांच्या घरीं तूं त्यांची सून म्हणून नांदायला जावंस, ही कल्पनाहि मला सहन होत नाहीं.

ऊर्मिला : आमचं लग्न ठरल्याचं समजल्याबरोबर बहुधा ते वसंताला घराबाहेर काढतील.

नाना : पण—पण अक्का, वसंताला तूं इतकीं वर्षं ओळखतेस. खरं सांग, त्याच्याशीं लग्न करून तूं सुखी होशील असं तुला वाटतं का ? माझ्या बोलण्याचा राग मानणार नसशील, तर बोलतों.

ऊर्मिला : मला राग यायचा नाहीं, नाना. पण तुम्ही काय बोलणार आहांत तें मला अगोदरच माहीत आहे.

नाना : माहीत असूनहि तें डोळ्याआड करण्याचा प्रयत्न करीत असशील तुझ्या आणि त्याच्या स्वभावांत जमीनअस्मानाचा फरक आहे. तो सालस असेल,

प्रेमळ असेल, पण तितकाच दुबळा आहे तो, अक्का. मी आतांच सांगतों, तो आयुष्यांत कांहींहि करणार नाहीं. खुशाल निष्क्रिय होऊन बसेल. पहिले कांहीं दिवस तुला कांहीं वाटणार नाहीं. पण पुढं तुला तें असह्य होईल. तुझ्यासारख्या बुद्धिमान्, स्वतंत्र वृत्तीच्या मुलीला त्याच्याबरोबर संसार करणं अशक्य वाटेल. त्याच्यामधें एवढं काय पाहिलंस तूं, अक्का ?

ऊर्मिला : कुणीं पाहिलं नसेल, असं कांहीं तरी पाहिलंय् मीं त्याच्यामधें—

नाना : प्रथम साऱ्यांना असंच वाटत असतं. तुझ्या आईलाहि तसंच वाटत होतं माझ्याबद्दल. तिच्या संसाराचा कसा विचका झाला पाहिलंस ना ?

ऊर्मिला : नका दुखवूं तुम्ही असं स्वतःला, नाना !

नाना : तुझ्या आईचं खडतर आयुष्य आठवलं कीं वाटायला लागतं, माझाच हेका चालविण्यांत मीं चूक तर नाहीं ना केली ?

ऊर्मिला : (विश्वास नसल्याप्रमाणें) नाना !

नाना : आयुष्य चकवा खेळतं आपल्याशीं, पोरी. काल प्रथम लक्षांत आलं माझ्या तें स्पष्टपणें. माझी स्वतःवरची श्रद्धा डळमळल्यासारखी झाली आहे.

ऊर्मिला : नाना, तुम्ही असं बोलूं नका हो ! मला भीति वाटते—

नाना : फार दूर यावं, तेव्हां कित्येक गोष्टींचं खरं महत्त्व ध्यानांत येतं. पण तेव्हां फार उशीर झालेला असतो. माझ्या या गाण्याच्या वेडापायीं तुम्हां दोघींना मीं अतोनात कष्ट दिले. खरोखर एकेकदां वाटतं, या सगळ्याची काय जरुरी होती !

ऊर्मिला : नाहीं नाना, असं नाहीं बोलायचं तुम्हीं. या गाण्याकरतां तुम्हीं आपलं सारं आयुष्य वेचलंत, केवढी तपश्चर्या केलीत; आणि आज—

नाना : (हंसून) जाऊं दे तें ! मी कांहीं तुझ्यासारखा शिकलेला नाहीं, अक्का. पण माझे अनुभवाचे बोल सांगतों. संसारांत एकानं सारखा त्याग करीत राहावं, सारखं मन मारीत राहावं, याला कांहीं अर्थ नाहीं. केवळ तुलाच नाहीं, तर वसंतालाहि त्यांत सुख लाभायचं नाहीं. तूं कुठंतरी पुढं निघून जाशील. तो मागेंच रेंगाळत राहील. माझं एवढंच सांगणं आहे, अक्का, घाई करूं नकोस. अजून विचार करून पाहा. पाहिजे तर एखाद-दोन वर्षं थांब.

ऊर्मिला : मला थांबणं शक्य नाहीं, नाना. शक्य तितक्या लवकर लग्न करून घ्यायचं असं ठरवलंय् मीं—

नाना : चांगलीच भुरळ घातलेली दिसतेय् त्यानं तुला.

ऊर्मिला : (शुष्कपणें हंसत) तर काय! (नानांचा हात धरून) नाना, तुम्ही माझ्यावर रागावलांत का?

नाना : वेडी! अग, तुझ्यावर रागावणं शक्य तरी आहे का मला?

ऊर्मिला : आणि वसंतावरहि रागवायचं नाहीं तुम्ही.

नाना : छे, छे. अग, तुला सांगायचं माझं काम होतं. तूं सगळा विचार करून मगच हें पाऊल टाकीत आहेस, असं कळलं ना मला? मग बस्स आहे. या-उपर माझ्या विचारांवर पडदा टाकला.

ऊर्मिला : नाना—(तिच्या डोळ्यांत पाणी उभं राहतं)

नाना : असं नाहीं करूं, अक्का—

(नाना ऊर्मिलेच्या केसांवरून प्रेमानें हात फिरवीत राहतात.)

नाना : चल आतां. वसंत येण्याचं कांहीं चिन्ह दिसत नाहीं. मी रामाला तरी जाऊन येतों. जाऊं ना?

(ऊर्मिला माननेंच हो म्हणते. नानांच्या मागें दार लोटून घेऊन, आणि बाहेरच्या खोलींतला दिवा मालवून ती स्वयंपाकघराकडे वळते. आंतून प्रकाशाचा झोत खोलींत येतो. थोडा वेळ कांहींच हालचाल होत नाहीं. नंतर दार उघडून सुनंदा हळूहळू आंत येते, सकाळच्या अल्लड मुलीची जागा आतां अति दुःखानं भारावलेल्या तरुणीनं घेतलेली आहे. तिच्या चेहऱ्यावर विकलता आहे. ती स्वयंपाकघराच्या दारापर्यंत जाते, पण आंत जाण्याचा तिला धीर होत नाहीं. ती तशीच परतते. दोन्ही हातांनीं चेहरा झाकून गदगदून हुंदके देते. शेवटीं अगतिकपणें परत जायला निघते. इतक्यांत चाहूल लागल्यामुळें ऊर्मिला खोलींत येते. परतणाऱ्या सुनंदाकडे पाहून ती दचकते. दिव्याचें बटण खालीं करून ती हाक मारते.)

**ऊर्मिला :** सुनंदा—(सुनंदा झरकन् मागें वळते. दोघी एकमेकींकडे पाहात उभ्या राहतात.)

**ऊर्मिला :** (प्रयासानें) माझ्याकडे आली होतीस ना ! मग परत कां चाललीस न भेटतां ? (सुनंदा हळूहळू पुढें येते, आणि भावविवशतेनें ऊर्मिलेच्या खांद्यावर डोकें ठेवते.)

**सुनंदा :** ऊर्मिला—ऊर्मिला, तुझी क्षमा मागायला आलें होतें ग मी—(ऊर्मिला तिच्यापासून दूर होत नाहीं पण तिचं सांत्वनहि करीत नाहीं.)

**ऊर्मिला :** त्याची कांहीं जरुरी नाहीं, नंदा.

**सुनंदा :** असं नको ग तोडून बोलूं. तुझ्याकडे येण्याचा धीर होत नव्हता, पण तशीच मनाचा हिय्या करून आलें. आज आलें नसतें, तर पुन्हा माझ्याच्यानं येणं झालं नसतं. म्हणून आलें ग, ऊर्मिला. पण इथं आल्यावर माझा धीर गडबडला. तुझ्या डोळ्यांना डोळे भिडवतां येतील असं वाटेना, म्हणून तशीच आल्या पावलीं परत चाललें होतें.

**ऊर्मिला :** माझा कांहीं मोठा अपराध केला असल्यासारख्या स्वरांत कां बोलत आहेस पण तूं ?

**सुनंदा :** मी तुझा फार मोठा अपराध केला आहे. केवळ तुझाच नाहीं, त्यांचाहि—

**ऊर्मिला :** तसं कांहीं नाहीं. सकाळीं जो प्रकार झाला, त्यामुळं तुला राग येणं अगदीं साहजिक होतं. एका परीनं तूं आलीस हें फार बरं झालं. मलाहि तुला सगळं उलगडून सांगायचं होतं.

**सुनंदा :** माझं सगळं जगच बदलल्यासारखं झालं आहे या एका दिवसांत. मी फार मोठी झालें ऊर्मिला ! असली निराशा तूं कधीं अनुभवली नाहींस. तुला या यातना कळायच्या नाहींत.

**ऊर्मिला :** खरंच कळायच्या नाहींत मला, नंदा—

**सुनंदा :** आजवर मी अगदीं आंधळी होतें ग. अण्णांनीं आणि त्यांच्याबरोबर मीं दिवाकरांच्या मनावर असे कांहीं घाव घातले आहेत—! त्यांच्या घुमेपणाचा अर्थ आज मला कळला. आज त्यांचं मन उकललं—

ऊर्मिला : अजूनहि तुझं त्यांच्यावर प्रेम आहे ?

सुनंदा : मला वाटतंय्, आजच मी त्यांच्यावर प्रथम प्रेम करायला लागलेंय. पण—पण—ऊर्मिला, ही भावना कांहीं वेगळीच आहे ग. त्यांनीं मला प्रत्युत्तर द्यावं, असं मला अगदीं वाटत नाहीं. ऊर्मिला, माझं एक ऐकशील कां ?

ऊर्मिला : काय ?

सुनंदा : त्यांनीं आजवर फार—फार सहन केलंय. मी त्यांना जें देऊं शकत नाहीं तें तूं देऊं शकशील. तूं त्यांना सुखी कर. तूं माझ्या सुखाच्या आड येतेस, असं तुला मुळीं—मुळीं वाटायला नको. त्यांचं तुझ्यावर किती प्रेम आहे, याची तुला पुरी कल्पना तरी आहे कीं नाहीं कोण जाणे. एवढं एक ऐकशील का माझं ? तूं त्यांच्याशीं लग्न केलं पाहिजेस—

ऊर्मिला : (ओरडून) Stop it !

सुनंदा : नाहीं, ऊर्मिला, तुझ्या हटवादानं तूं आपल्या तिघांचींहि आयुष्यं दुःखी करशील. तूं त्यांच्याशीं—

ऊर्मिला : I say, stop it !

सुनंदा : पण कां ? तुमचं दोघांचं एकमेकांवर इतकं विलक्षण प्रेम असतांना—

ऊर्मिला : तुझी कल्पना चुकीची आहे, सुनंदा. माझ्या मनांत दिवाकरांविषयीं तशी कांहीं भावना नाहीं.

सुनंदा : (निकरानें) तें शक्य नाहीं.

ऊर्मिला : कां ? यांत अशक्य असं काय आहे ?

सुनंदा : (आश्चर्यानें) पण मग आज सकाळीं—

ऊर्मिला : तेंच तर मला सांगायचं होतं तुला. गोपाळकाकांनीं भेटायला बोलावलं होतं मला. त्यांच्याशीं बोलणं झाल्यावर मी फार अस्वस्थ झालें. तुझ्याकडे सुद्धां येणार नव्हतें मी. आणि तितक्यांत दिवाकर आले. त्यांनीं बोलायला सुरवात केल्यानंतर मी इतकी दिङ्मूढ झालें कीं, त्यांना विरोध करणंहि मला जमलं नाहीं. पण तूं ऐकलंसच मीं त्यांना शेवटीं सरळ सांगितलं तें. त्यांच्याशीं लग्न करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं, सुनंदा—

(सुनंदा सुन्नपणानें ऊर्मिलेकडे पाहात राहते.)

ऊर्मिला : तुला आजवर न सांगितलेली आणखी एक गोष्ट सांगायचीय् मला— मीं वसंताशीं लग्न करायचं ठरवलं आहे.

सुनंदा : (विश्वास नसल्याप्रमाणें) नाहीं !

ऊर्मिला : मी अगदीं मनापासून बोलतेंय्.

(सुनंदा हळूहळू रडूं लागते.)

ऊर्मिला : (चिडल्याप्रमाणें) तुझं रडणं थांबव, नंदा.

सुनंदा : (हुंदक्यांमधें) त्यांना सुख मिळायचं नाहीं, असंच ठरल्यासारखं दिसतंय्.

ऊर्मिला : I am sorry! (सुनंदाचा स्वत:वरचा ताबा सुटतो. ती रडत रडत खालीं कोसळते. ऊर्मिला तिला सावरते.)

ऊर्मिला : (करड्या आवाजांत) तूं फार दमली आहेस, सुनंदा. चल, जरा आंतल्या खोलींत पड पाहूं बिछान्यावर—[ऊर्मिला सुनंदाला कशीबशी स्वत:च्या खोलींत नेते. ती जात असतांनाच वसंत दाराशीं येऊन उभा राहतो. ऊर्मिला थोड्या वेळानें बाहेर येते.)

ऊर्मिला : (सुनंदाला उद्देशून) मी तुझ्याकरतां थोडी कॉफी घेऊन येतें हं—

(ऊर्मिला मागें वळते. तोंच तिला वसंत दिसतो. ऊर्मिला क्षणभर गोंधळते.)

ऊर्मिला : ये, वसंत. जरा बसतोस का ? सुनंदाला बरं वाटत नाहीं. तिला कॉफी करून देतें मी.

वसंत : बसण्याइतकं कांहीं बोलायचं नाहीं मला. खरं म्हणजे मी तुझ्याकडे आलोंच नव्हतों. नानांकडे आलों होतों.

ऊर्मिला : असं, असं ! नाना रामाला जाऊन येतों म्हणाले. ते येईपर्यंत तरी बसशील कीं नाहीं ?

वसंत : मला थांबायला वेळ नाहीं. त्यांना माझा निरोप सांग कीं मी उद्यां- पासून क्लासला येणार नाहीं. मीं गाणं सोडलं. पुन्हा मी या घरीं येईन असंहि मला वाटत नाहीं. (वसंत जायला वळतो.)

ऊर्मिला : अरे, अरे, पण एक मिनिट तरी थांबशील? तुला एक बातमी सांगायचीय्.

वसंत : मला ती अगोदरच कळलीय्—

ऊर्मिला : खरं म्हणजे तुला सगळ्यांच्या आधीं कळावी हें रास्त. पण तसं झालं नाहीं हें दुर्दैव तुझं आणि माझं!

वसंत : ऊर्मिला, तुला हा सगळा विनोद वाटत असेल. पण मला वाटत नाहीं. मीच उगीच स्वतःची फसवणूक करीत राहिलों. तूं कधींकाळीं माझी होशील अशी कल्पना करणंच चुकीचं होतं.

ऊर्मिला : तर काय? जी गोष्ट प्रत्यक्षांत होणार आहे, तिची फक्त कल्पना करीत राहणं हें चुकीचं नाहीं तर काय?

वसंत : ऊर्मिला—

ऊर्मिला : आपला वैताग सोडून जरा माणसांत या म्हटलं, महाराज—

वसंत : तूं काय सांगत्येय्स?

ऊर्मिला : अजून नाहीं का डोक्यांत प्रकाश पडला? बरं, आतां अगदीं सरळ शब्दांत सांगूं? मीं तुझ्याशीं लग्न करायचं ठरवलंय्.

वसंत : (आश्चर्यानें) ऊर्मिला—

ऊर्मिला : हो हो—तूं अगदीं जागा आहेस बरं. स्वप्नांत नाहींस.

वसंत : पण दिवाकराचं आणि तुझं—

ऊर्मिला : आलं का पुन्हा तुझं कांहीं तरी? वेड्या, कांहीं तरी ऐकलंस, आणि तेंच घेऊन बसलास ना? तसलं कांहीं होणं शक्य तरी आहे का?

वसंत : (शंकितपणें) ऊर्मिला, तूं मला वचन दिलं आहेस म्हणून तर—

ऊर्मिला : नाहीं, नाहीं, नाहीं! किती रे शंका काढशील?

वसंत : नानांना सांगितलंस?

ऊर्मिला : हो, आत्तां संध्याकाळींच—

वसंत : (आनंदून) खरंच? ते काय म्हणाले?

ऊर्मिला : त्यांना फार फार आनंद झाला. आणि तुला एक सांगू का वसंत? ते जरी वरवर तुझ्याबद्दल उदासीनता दाखवीत असले, तरी मनांतून त्यांना तुझ्याबद्दल खूप आशा आहे. तुला दिलेल्या विद्येचं तूं कांहीं तरी चीज करशील असं त्यांना फार वाटतं.

वसंत : खरं का ग, ऊर्मिला?

ऊर्मिला : खोटं कशाला सांगू? आणि वसंत, तूं गाण्यावर अगदीं मनापासून श्रम केले पाहिजेस.

वसंत : हो, हो, ऊर्मिला—(वसंत भावावेगानें ऊर्मिलेचे हात धरतो. ती ते हळूच सोडवून घेते.)

ऊर्मिला : बरं, तूं आतां नाना येईपर्यंत बसतोस ना? मी घरांत जातें कॉफी करायला. (वसंत मानेनें 'हो म्हणतो. ऊर्मिला स्वयंपाकघरांत निघून जाते. वसंत स्वतःशीं आनंदानें गुणगुणत राहतो. तितक्यांत नाना येतात. त्यांच्या हातांत पेढ्यांचा पुडा आहे.)

नाना : (आंत येतां येतांच) अक्का, अग अक्का—(वसंताकडे त्यांचें लक्ष जातें.) वा, वा वसंतराव! तुम्ही पण इथंच का? आतां तुम्हांला वसंतराव म्हणायला पाहिजे, नाहीं का?

वसंत : नाना—

नाना : अरे, काय लबाड तुम्ही मुलं! मला म्हाताऱ्याला पत्तासुद्धां लागूं दिला नाहीं ना?

वसंत : (हंसत) खरं म्हणजे फार अनपेक्षितपणानं—

नाना : पुरे, पुरे, आतां बनवूं नकोस मला. तुमचं सगळं गुपित मला कळून चुकलंय्. हे पेढेसुद्धां आणले बघ मीं. चल प्रथम तोंड गोड कर पाहूं. अक्का, अग पेढे आणले आहेत मीं.

ऊर्मिला : (स्वयंपाकघराच्या दाराशीं येऊन) किती घाई हो तुमची, नाना!

नाना : पण एक खाशील ना?

ऊर्मिला : आतां नाहीं. कामांत आहें मी. तुम्ही दोघं कॉफी घेणार ना?

**नाना** : हो चालेल कीं—काय हो जांवईबुवा ?

**ऊर्मिला** : पुरे हं, नाना—

(ऊर्मिला चटकन आंत जाते.)

**नाना** : अण्णासाहेबांना कळवलं नसशील.

**वसंत** : नाहीं, वेळच नाहीं झाला.

**नाना** : त्यांना कांहीं हें पटेल असं वाटत नाहीं.

**वसंत** : कांहीं सांगतां येत नाहीं.

**नाना** : बरं, तें पुढचं पुढें. अगोदर आपण पेढे तर खाऊन घेऊं.

**वसंत** : सुनंदा आहे आंतल्या खोलींत.

**नाना** : वा, अरे मग तिला बोलाव ना बाहेर.

**वसंत** : तिला जरा बरं वाटत नव्हतं म्हणून पडल्येय् ती.

**नाना** : बरं, मग आपणच जाऊं तिच्याकडे. अक्कानं सांगितलं कीं नाहीं तिला ?

**वसंत** : कांहीं माहीत नाहीं बुवा.

**नाना** : तिला कोण आनंद होईल ! अक्का, अग सुनंदाला माहीत आहे का ?

**ऊर्मिला** : (आंतून) हो, मीं सांगितलंय् नाना—

**नाना** : बरं, बरं—आम्ही सगळीं तुझ्याच खोलींत बसतों. तिकडंच आण ग कॉफी.

**ऊर्मिला** : (आंतून) हो–हो—ही झालीच तयार—

(नाना आणि वसंत ऊर्मिलेच्या खोलींत जातात. नानांच्या हंसण्याचा आणि बोलण्याचा आवाज ऐकूं येतो.)

**ऊर्मिला** : (स्वयंपाकघराच्या दाराशीं येऊन) ए वसंत, ही कॉफीची किटली घेऊन जा रे माझ्या हातांतली. मी कप आणतें मागून लगेच.

**वसंत** : (आंतून) आलों ग—

(वसंत घाईघाईनें येऊन ऊर्मिलेच्या हातांतली किटली घेऊन जातो. ऊर्मिला आंत

जाते. तेवढ्यांत बाहेरचें दार हळूच उघडून दिवाकर येतो. खोलींत कोणीच न दिसल्यामुळें गोंधळून उभा राहतो. शेवटीं तो स्वयंपाकघराकडे वळतो. तितक्यांत एका ताटांत चार कप घेऊन ऊर्मिला बाहेर येते. दिवाकराला पाहिल्याबरोबर ती इतकी दचकते कीं, तिच्या हातून तें ताट निसटतें आणि खालीं पडतें.)

**ऊर्मिला** : तुम्ही ?

**दिवाकर** : हो—तूं एकटी भेटलीस हें फार बरं झालं.

(आंतल्या खोलींतून नाना आणि वसंत हंसत हंसत बाहेर येतात.)

**नाना** : काय ग पडलं, अक्का ? (दिवाकराला पाहून) कोण दिवाकर ? वा अगदीं वेळेवर आलांत.

(ऊर्मिला खालीं वाकून कांचा गोळा करीत आहे. तिच्याकडे पाहून)

**नाना** : काय ग हें, अक्का ? अग, आतां तूं डॉक्टर होणार, एवढंच नाहीं तर संसार थाटणार, आणि असा वेंधळेपणा करून कसं चालेल ?

**ऊर्मिला** : (ताट बाजूला ठेवत) उंबरा ओलांडतांना ठेच लागली. कसं ताट निसटलं हातांतून, कोण जाणे !

**नाना** : जाऊं दे, जाऊं दे. तुला लागलं बिगलं नाहीं ना ? मी आपला सहज म्हणालों हो. दिवाकर, इतक्या छान मुहूर्तावर आलांत बघा तुम्ही. सुनंदा, अग ती पेढ्यांची पुडी आण बरं—

**ऊर्मिला** : (अस्पष्ट स्वरांत) नाना—

(नानांचं ऊर्मिलेकडे लक्ष नसतं. सुनंदा पेढ्यांची पुडी घेऊन आंत येते. ती आपल्याकडून आनंद दाखविण्याचा प्रयत्न करीत असते. पण दिवाकराला पाहिल्यावर ती सुन्न होते. नाना तिच्या हातून पेढ्यांची पुडी घेतात )

**नाना** : अमच्या आक्काचं आणि वसंताचं लग्न ठरलं, दिवाकर. त्याचे हे पेढे.

**दिवाकर** : असं का ? वा छान ! पण तुमच्या हातून नकोत बुवा. ऊर्मिलाताईनीं स्वतः दिले पाहिजेत.

**नाना** : वा, जरूर. अक्का, दे बरं त्यांना पेढे.

**ऊर्मिला** : तुम्हीच द्या, नाना.

**नाना** : असं कसं ? तुझं लग्न आहे ना ?

(ऊर्मिला पुड्यांतले दोन पेढे उचलून दिवाकराच्या हातांत ठेवते.)

**दिवाकर** : वा, दोन कसे पुरतील ? निदान पांच तरी हवेत.

(ऊर्मिला कांहीं न बोलतां आणखी पेढे दिवाकराच्या हातावर ठेवते. तो एका-मागून एक खाऊन टाकतो.)

**दिवाकर** : (खातां खातां) Heartiest congratulations, ऊर्मिलाताई, आणि तुम्हांलाही वसंतराव. Wish you both a very happy married life. तुमच्या लग्नाला मात्र मी इथें नसणार—

**सुनंदा** : (मधेंच) म्हणजे तुम्ही—

**दिवाकर** : (तिचें बोलणें तोडून) मी आज रात्रीच्या गाडीनं गांवाला चाललोंय्.

(सुनंदा मटकन् खुर्चीवर बसते.)

**नाना** : कां हो असे मधेंच ?

**दिवाकर** : हो आमची म्हातारी काकी आजारी असल्याची तार आलीय्. तेव्हां जायला पाहिजे.

**नाना** : असं असं. लवकरच परत येणार आहांत ना ?

**दिवाकर** : कदाचित् येणारहि नाहीं परत.

**नाना** : म्हणजे ?

**दिवाकर** : मीं नोकरीचा राजीनामा दिला आहे.

**नाना** : काय म्हणतां काय !

**वसंत** : दिवाकर—

**दिवाकर** : त्यांत एवढं आश्चर्य वाटण्यासारखं काय आहे ? मीं पुणं कायमचं सोडायचं ठरवलं आहे.

**वसंत** : (सदिच्छेनें) दिवाकर, तुला काय वाटत असेल त्याची कल्पना आहे मला. पण असं मधेंच सारं सोडून कुठं जाणार आहेस तूं ? पुन्हा अशी नोकरी मिळणं फार कठीण जाईल. I am very sorry for you. पण—

**दिवाकर** : It's all right. तुझ्या सहानुभूतीची अपेक्षा नाहीं मला.

नाना : अरे पण तुम्हांला असं एकदम संतापायला कारण काय झालं ? कॉलेजमध्ये कांहीं बिनसलं कीं काय ? आणि काहीं जरी असलं, तरी तुमचे सगळे लागेबांधे इथं जुळलेले. अण्णासाहेबांची तुमच्यावर केवढी मदार. या सुनंदाशीं तुमचं लग्न ठरलेलं—

दिवाकर : (कर्कश स्वरांत) तें लग्न मोडलं. तिचा माझा कांहीं संबंध नाहीं.

(सुनंदाच्या तोंडून एक घुसमटलेला आवाज बाहेर पडतो.)

दिवाकर : For God's sake, stop crying. निदान मला तुझा तिरस्कार तरी करायला लावूं नकोस.

सुनंदा : मी रडत नाहीं आहें.

दिवाकर : फार उपकार करीत आहेस माझ्यावर !

नाना : दिवाकर, जरा शांत व्हा. अहो, तुम्हां तरुण माणसांत कधीं ना कधीं भांडणं हीं व्हायचींच. त्यामुळं डोक्यांत राख घालून कसं चालेल ?

दिवाकर : भांडण नव्हे हें, नाना. हा शुद्ध कृतघ्नपणा आहे. अण्णासाहेबांनीं मला मदत केली; पण मी शेवटीं त्यांच्यावरच उलटलों. त्यांच्या मुलीशीं मी लग्न करीन, असं त्यांना वचन दिलं होतं; पण तें मीं मोडलं. तेव्हां सांगतों काय, या सगळ्या लोकांची मीं फसवणूक केली आहे.

नाना : दिवाकर, जरा शांत व्हा पाहूं.

दिवाकर : मी अगदीं शांत आहें, नाना. तुम्हांला सगळ्यांना माझ्या वागण्याचं आश्चर्य वाटेल कदाचित्. पण खरं सांगूं का ? त्रेतायुगांतल्या त्या प्रामाणिकपणाच्या कल्पनांवर आपला कांहीं विश्वास नाहीं बुवा. शब्द दिला होता खरा. पण आतां नाहीं त्याची किंमत वाटत. तर उगीच काय मन मारीत राहायचं ? त्याला कांहीं फारसं कारण आहे, असंहि नाहीं. आपली मनाची एक लहर म्हणा ना—

(दिवाकर थोडा वेळ स्तब्ध राहतो. त्याच्या बोलण्याच्या धारेनें सार्वजण बावरल्यासारखीं होतात. कुणीच कांहीं बोलत नाहीं. तो पुढें बोलत असतांना प्रकाश हळूहळू मंदावत जातो.)

**दिवाकर** : तुम्ही कुणीच कांहीं बोलत नाहीं ? तुम्हांला हें सारं पटायचं नाहीं, मला माहीत आहे. तुम्ही फार मोठीं माणसं आहांत. मी आपला एक सामान्य, विकारांच्या आधीन होणारा माणूस आहें. पण मी असा सामान्य आहें म्हणूनच मला स्वतःची गुलामी पत्करतां येत नाहीं. मला सावरून राहतां येत नाहीं. एक बेफाम लाट आली, आणि तिच्यावर मी बेगुमानपणें शरीर झोकून दिलं. माझं पुढं काय होईल याची पर्वा न करतां एकदां तरी जगलों—जिवंतपणाच्या खऱ्या जाणिवेनं जगलों. जातों मी—

(तो हें बोलत असतांना प्रकाश पूर्ण मंदावतो. शेवटच्या दोन तीन वाक्यांत प्रकाशाचा गोल फक्त त्याच्यावरच स्थिरावतो. बाकी सर्व रंगभूमीवर अंधार होतो. तो वळल्याबरोबर ऊर्मिला त्याच्याकडे धावत येते आणि प्रकाशगोल त्या दोघांवर केंद्रित होतो.)

**ऊर्मिला** : (दिवाकराचा हात धरून) नाहीं, नाहीं—तुम्हीं असं एकटं जायचं नाहीं. मला सोडून तुम्हीं जायचं नाहीं. तुम्ही गेलांत तर माझे प्राणहि तुमच्याबरोबर जातील. नुसतं शरीर मागें राहील.

**दिवाकर** : ऊर्मिला !—

**ऊर्मिला** : मलाहि जपून राहायचं नाहीं. मलाहि या कक्षेचा वीट आला, उबग आला !

**दिवाकर** : तूं वसंताशीं लग्न करायचं ठरविलं आहेस ना पण ?

**ऊर्मिला** : मला स्वतःचा भरंवसा राहिला नव्हता, दिवाकर. मीं तसं करायचं ठरवलं नसतं तर मला माझ्या आवेगाला बांध घालतां आला नसता—

**दिवाकर** : हा ज्वालेशीं खेळ आहे, ऊर्मिला—

**ऊर्मिला** : कशा-कशाचीच पर्वा करूं नये, असं कांहीं तरी सांपडलंय् मला. दिवाकर—चला मी तुमच्याबरोबर येतें. याच पावलीं तुमच्याबरोबर येतें.

**दिवाकर** : वेडे पोरी—

**ऊर्मिला** : (सुखातिशयानें) दिवाकर ! (ती त्याच्या छातीवर मस्तक विसावते.) मी स्वतःशीं झगडून दमलें, दिवाकर. मला इथून दूर दूर घेऊन चला. दोघंच

दोघं कुठेंतरी अवकाशांत तरंगत जाऊं या—(दिवाकर ऊर्मिलेच्या कमरेभोंवतीं हात टाकतो. तीं दोघं दाराबाहेर जातात. प्रकाशगोलहि त्यांच्याबरोबर अदृश्य होतो. क्षणभर रंगभूमीवर संपूर्ण अंधार. परत जेव्हां प्रकाश होतो, तेव्हां ऊर्मिला पूर्वींच्याच जागीं खिळल्यासारखी उभी आहे. दिवाकर गेलेला आहे. अंधारांतून अस्फुट आवाज येतो, 'दिवाकर गेले, दिवाकर गेले')

**सुनंदा** : (ऊर्मिलेजवळ येऊन, रडत) ते गेले ग ऊर्मिला, कायमचे गेले. मला पुन्हा कधींहि दिसणार नाहींत. आतां सगळा अंधार आहे ग—

(ऊर्मिला तिला यांत्रिकपणें जवळ घेते. नाना 'हरे राम, हरे राम' असें म्हणत विषण्णपणानें आंतल्या खोलींत जातात. ऊर्मिला कांहीं तरी बोलण्याकरतां ओठ हलवते. पण तिला बोलतांच येत नाहीं.)

**सुनंदा** : आतां मी काय करूं ग?

**ऊर्मिला** : (प्रयासानें) सुनंदा, तुझ्या हातांतली का होती ती गोष्ट? विसरशील तूं कांहीं दिवसांनीं.

**सुनंदा** : नाहीं—नाहीं! त्यांना विसरणं शक्य नाहीं मला—

**ऊर्मिला** : त्यांना विसरणं तुला शक्य नाहीं!

**सुनंदा** : तुझ्यासारखी निग्रही नाहीं ग मी, ऊर्मिला—

(सुनंदा खुर्चीवर बसून हातांच्या ओंजळींत तोंड झाकते. ऊर्मिला तिच्याकडे पाहून हंसूं लागते. हळुहळूं ती इतकी हंसायला लागते कीं, तिचं तिलाच अनावर होतं.)

**वसंत** : (ओरडून) ऊर्मिला—!

(ऊर्मिला हंसणं थांबवून नुसतीच प्रश्नार्थक मुद्रेनें त्याच्याकडे पाहते.)

**वसंत** : (खालच्या आवाजांत) हंसूं नकोस अशी.

**ऊर्मिला** : कां? कां नको हंसूं?

(एखाद्या स्वप्नांतल्या व्यक्तीप्रमाणें चालत ऊर्मिला ऑर्गनजवळ जाते. उभ्याउभ्याच एक भाता दाबून विमनस्कपणें विचित्र सूर काढूं लागते.)

**वसंत** : ऊर्मिला! तुला काय झालंयू.

**ऊर्मिला** : (वाजवणें थांबवून) मला ? मला कैफ चढला आहे. आयुष्याची लढाई जिंकली आहे ना मीं ! मला धन्यता वाटायला हवी, मला अभिमान वाटायला हवा, पण मला फक्त माझा तिरस्कार वाटतोय्.

**वसंत** : (तिच्याजवळ जात) ऊर्मिला—

**ऊर्मिला** : (कर्कशपणें ओरडून) दूर राहा—माझ्याजवळ येऊं नकोस. या क्षणीं तरी मला एकटीलाच राहूं दे—

(वसंत दबकून थबकतो. ऊर्मिला दोन्ही हात ऑर्गनवर दाबून श्रांतपणें खुर्चीवर बसते आणि हातांवर मस्तक ठेवते. ऑर्गनचे संमिश्र विसंवादी सूर हलके हलके विरत असतांनाच—)

**प ड दा**